मुसलमानी अमदानींतील

# मराठे सरदार.

दत्तात्रय बळवंत पारसनीस.

किंमत ५ आणे.

## सलमानी अमदानींतील

# मराठे सरदार.



हा ऐतिहासिक निबंध

मुंबई हिंदुयुनियन क्लब–हेमंतव्याख्यानमालेकरितां

**दत्तात्रय बळवंत पारसनीस**

ह्यांनीं तयार केला;

तो

**मुंबईमध्यें,**

**जावजी दादाजी यांच्या**

"निर्णयसागर" छापखान्याचे मालक **तुकाराम जावजी**

यांनीं छापून प्रसिद्ध केला.

(आवृत्ती २ री)

नोवेंबर १९०९.

**किंमत ५ आणे.**

# प्रस्तावना.



नामदार न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे ह्यांनीं मराठ्यांच्या इतिहासाचा पहिला भाग नुकताच प्रसिद्ध केला आहे. त्यांत "How the ground was prepared ?" (**"जमीन कशी तयार केली ?"**) ह्मणून जो भाग आहे, तो वाचून, "मुसलमानी अमदानींतील मराठे सरदार" ह्या विषयाची माहिती मिळविण्याची प्रेरणा झाली. त्याप्रमाणें प्रयत्न करून जी अल्पशी माहिती उपलब्ध झाली, ती प्रकृत निबंधांत सादर केली आहे. विषयविवेचनाच्या सोयीकरितां, ह्या ऐतिहासिक निबंधाचे, अनुक्रमें, (१) विषयप्रवेश–मराठ्यांचा इतिहास, (२) महाराष्ट्र व मराठे, (३) मुसलमानी अमदानी, (४) मराठे सरदार, आणि (५) उपसंहार, असे पांच भाग केले आहेत. त्यांत विषयास अनुरूप अशी माहिती संक्षेपरूपानें दिली आहे. "मराठे सरदार" ह्या भागांत निंबाळकर, घाटगे, शिर्के, मोहिते आणि माने ह्या पांच घराण्यांचीच अल्पशी माहिती दिली आहे. ती वाचकांस पसंत पडली, तर इतर मराठे सरदारांचीही माहिती पुस्तकरूपानें प्रसिद्ध करितां येईल.

ह्या निबंधाचा कांहीं भाग, मुंबई येथील युनियन क्लबचे सेक्रेटरी प्रिन्सिपाल दामोदर गणेश पाध्ये एम्. ए. ह्यांच्या विनंतीवरून, "हेमंतव्याख्यानमाले"मध्यें, ता० २५ नोवेंबर इ० स० १९०० रोजीं, वाचून दाखविण्यांत आला. त्याचें ज्या इतिहासप्रिय व रसिक मित्रांनीं अभिनंदन केलें, त्या सर्वांचा मी फार आभारी आहें.

ह्या निबंधांतील फलटणच्या निंबाळकर घराण्याची माहिती

फलटण संस्थानचे कारभारी व माझे सन्मान्य मित्र रावसाहेब शंकरराव भालचंद्र बापट ह्यांनीं दिली; व माने ह्यांच्या घराण्याची माहिती रा. रा. कृष्णाजी विष्णु आचार्य ह्यांनीं दिली. ह्याबद्दल ह्या उभय गृहस्थांचे, व हा निबंध छापून प्रसिद्ध करण्याचे कामीं "निर्णयसागर" छापखान्याचे मालक व माझे सुशील मित्र रा. रा. तुकारामशेट ह्यांनीं विशेष साहाय्य केलें, ह्याबद्दल त्यांचे फार फार आभार प्रदर्शित करून, ही अल्पशी प्रस्तावना येथें संपवितों.

द. ब. पा.

---

## दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

मूळामध्यें विशेष फेरफार न करितां ही आवृत्ति प्रसिद्ध केली आहे.

द. ब. पा.



# मुसलमानी अमदानींतील

# मराठे सरदार.



## भाग १ ला.



### विषयप्रवेश—मराठ्यांचा इतिहास.

मराठ्यांचा अभ्युदय व मराठी राज्याची संस्थापना हा अत्यंत महत्त्वाचा विषय आहे. ह्या विषयाचें ऐतिहासिक दृष्ट्या, सोपपत्तिक, तात्त्विक आणि मुद्देसूद असें विवरण व्हावयास पाहिजे आहे. परंतु आजपर्यंत मराठ्यांच्या इतिहासाचीं खरीं साधनें उपलब्ध झालीं नसल्यामुळें, ह्या विषयाचा ऊहापोह व्हावा तसा झालेला नाहीं. मराठ्यांचे अव्वल इतिहासकार ह्मटले ह्मणजे ऑर्मे, स्कॉटवेरिंग व ग्रांटडफ् हे होत. ह्यांपैकीं पहिल्या दोन गृहस्थांचे इतिहास, अनुक्रमें इ. स. १७८४ व इ. स. १८१०, ह्या सालांमध्यें प्रसिद्ध झाले आहेत. परंतु ते मराठी राज्यसत्ता कायम असतांनाच लिहिलेले असल्यामुळें, त्यांत मराठ्यांच्या सामान्य माहितीपेक्षां अधिक महत्त्वाचा इतिहास मुळींच आलेला नाहीं. ह्याचें कारण, एक तर, त्या वेळीं मराठ्यांचें व त्यांचें चांगलेंसें दळणवळण नव्हतें; व दुसरें, पेशवाई अंमल कायम असल्यामुळें राजकीय दृष्ट्या मराठ्यांचे कागदपत्र परकीयांच्या दृष्टीस पडणें शक्य नव्हतें. ह्यामुळें पहिल्या दोन इतिहासकारांनीं, रेसिडेन्सीमधील मुनशांचे मार्फत मिळालेल्या फारसी तवारिखा, किंवा

मराठी वकिलांचे मार्फत मिळालेल्या मराठी बखरी, ह्यांवर सर्वस्वीं विश्वास ठेवून, त्यांच्या आधारें मराठी राज्याचें संक्षिप्त टिपण तयार केलें आहे, असें ह्मटलें तरी चालेल. ह्या दोन इतिहासांनंतर, कांहीं वर्षांनीं, ह्मणजे इ. स. १८२६ सालीं, ग्रांटडफ् साहेबांनीं आपला लोकविख्यात "मराठ्यांचा इतिहास" प्रसिद्ध केला. पहिल्या दोन ग्रंथांच्या मानानें पाहिलें असतां, हा इतिहास बराच सविस्तर, संगतवार आणि साधार असा आहे.

क्याप्टन ग्रांटडफ् हे, पेशवाई खालसा झाल्यानंतर कांहीं दिवस, सातारा येथें छत्रपति प्रतापसिंह महाराज ह्यांचे दरबारीं रेसिडेंट होते. त्यांचा व छत्रपतींचा विशेष स्नेहसंबंध जुळल्यामुळें त्यांना सातारा येथील अमूल्य इतिहासभांडार अनायासें खुलें झालें. प्रतापसिंह महाराज व इतर अनेक मराठे सरदार व मुत्सद्दी ह्यांनीं उदार मनानें आपले जुने कागदपत्र व जुन्या बखरी ग्रांटडफ् साहेबांस सादर केल्या. प्रतापसिंह महाराजांनीं खुद्द पेशव्यांच्या देखील नजरेस न पडलेले असे, इतिहासदृष्ट्या अत्यंत मूल्यवान् व महत्त्वाचे, अस्सल कागदपत्र ग्रांटडफ् साहेबांस दाखविले, असें त्यांनीं प्रस्तावनेंत स्पष्ट लिहिलें आहे. सातारच्या दप्तराप्रमाणें पुणें येथील पेशव्यांचें दप्तर व इंग्रजांच्या राजकारस्थानांचे गुप्त पत्रव्यवहार वगैरे सर्व कागद ग्रांटडफ् साहेबांस उपलब्ध झाले होते. अर्थात् त्या वेळच्या विद्याभिरुचीच्या मानानें मराठ्यांनीं, ग्रांटडफ् साहेबांस आपल्या इतिहासाची विपुल सामग्री जमवून दिली होती, ह्यांत शंका नाहीं. परंतु ग्रांटडफ् साहेबांस त्या सामग्रीचा अनेक कारणांस्तव यथायोग्य उपभोग करितां आला नाहीं. तथापि, तोच मराठ्यांचा, व्यवस्थित व विस्तृत रीतीनें लिहिलेला असा पहिला इतिहास असल्यामुळें, त्याची महती वाढून, तो आजपर्यंत प्रमाणभूत व सर्वमान्य ग्रंथ होऊन बसला

आहे. ग्रांटडफ् साहेबांचे मित्र व सातारचे दुसरे रेसिडेंट जनरल ब्रिग्ज ह्यांनीं प्रतापसिंह महाराजांस "ह्या इतिहासाचें भाषांतर करून तें छापून प्रसिद्ध करावें, व ज्याप्रमाणें हा उत्कृष्ट इतिहास लिहून ग्रांटडफ् साहेबांनीं युरोपखंडामध्यें कीर्ति मिळविली, त्याप्रमाणें तो प्रकाशित करून प्राच्य देशामध्यें कीर्ति मिळवावी.*" ह्मणून ता० २० आगष्ट १८२७ रोजीं लिहिलेलें एक पत्र छत्रपतींच्या दप्तरांत उपलब्ध झालें आहे. ह्यावरून त्या काळीं ह्या इतिहासाची फारच योग्यता मानिली जात असे, असें सिद्ध होतें. जनरल ब्रिग्ज ह्यांनीं सुचविल्याप्रमाणें प्रतापसिंह महाराजांनीं ह्या इतिहासाचें मराठी भाषांतर पुढें तयार करविलें होतें. त्याच्या हस्तलिखित प्रती सातारा येथील पंडितराव ह्यांच्या दप्तरांत व मद्रास येथील सरकारी लेखसंग्रहालयांत अद्यापि दृष्टीस पडतात.

ग्रांटडफ् साहेबांच्या इतिहाससंबंधानें झालेला हा उत्तम ग्रह फक्त परदेशीय ग्रंथकारांच्या लेखांतच दृष्टीस पडतो असें नाहीं; तर एतद्देशीय ग्रंथकारांनींही त्यासंबंधानें चांगले उद्गार काढिले आहेत. स्वभाषा, स्वधर्म, आणि स्वदेश ह्यांचा निस्सीम अभिमान बाळगणारे बाणेदार लेखक कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर ह्यांनीं ग्रांटडफ् साहेबांच्या इतिहाससंबधानें असें लिहिलें आहे कीं, "हा इतिहास एकंदरींत पाहतां अत्यंत

---

* जनरल ब्रिग्ज ह्यांच्या पत्रांत पुढील मजकूर आहे:—

"I trust your Highness has received his history of the Mahratta Empire, which your Highness should procure to be translated by degrees into the Mahratta language, after which it might be struck of on Lithography (*chapp*) at Bombay, which would obtain as great a name for your Highness in the East, as your friend Captain Grant Duff has established for himself in Europe by compiling his excellent history."

प्रशंसनीय होय. जो जो मजकूर इतिहासकर्त्यास खरा वाटला, तो तो त्यानें दाखल करून, इंग्लिशांविषयीं पक्षपात, किंवा मराठ्यांविषयीं द्वेषभाव, किंवा मत्सर, अशा वृत्ति कोठेंही प्रगट केल्या नाहींत. त्याप्रमाणेंच, पुष्कळ इंग्रजी ग्रंथकारांस एतद्देशीय लोकांच्या संबंधानें लिहितांना पोकळ पांडित्य करण्याची जी हौस असते, आणि ज्ञान व नीति यांत आपल्या राष्ट्राचें वर्चस्व वरचेवर दाखविल्याखेरीज कधीं चैन पडत नसतें, तोही प्रकार यांत नाहीं. सारांश, प्रस्तुत इतिहास आपल्या लोकांस सुद्धां निःपक्षपातपणानें लिहिलेला असा वाटण्यासारखा आहे; व धर्म, नीति वगैरेंच्या संबंधानेंही एतद्देशीयांस राग येण्यासारखा त्यांत बिलकूल मजकूर नसल्यामुळें तो त्यांस सर्वदा प्रिय व्हावा असें आहे." शास्त्रीबोवांप्रमाणेंच माजी 'काव्येतिहाससंग्रह'कर्त्यांनीं ह्या इतिहासाविषयीं असेंच अनुकूल मत दिलें आहे. ते ह्मणतातः—"आज हिंदुस्थानचे जे इंग्रजी इतिहास आहेत, त्यांतील उत्तमांत हा मोडतो. किंबहुना, हाच त्या सर्वांत उत्तम ठरतो. प्रत्येक महाराष्ट्रीय जन ह्मणविणारानें—किंबहुना प्रत्येक हिंदु ह्मणविणारानेंही—ह्या इतिहासाची प्रत संग्रहीं ठेवावी. निदान एकवार ती कोठें मिळवून वाचण्याची तरी तसदी घ्यावी. असें केल्यानें आमचे लोक ह्मणजे गचाळ, वेडे, पौरुषहीन, अकल्पक असे जे आह्मांपैकीं पुष्कळांचे ग्रह झालेले आहेत ते जाऊन, आपल्या लोकांच्या पराक्रमाविषयीं, बुद्धीविषयीं, चातुर्याविषयीं वगैरे तथ्य वाटून योग्य अभिमान जागृत होईल."

ग्रांटडफ् साहेबांच्या मराठ्यांच्या इतिहासाविषयींचें हें आमच्या देशांतील इतिहासज्ञ विद्वद्वर्योंचें मत सर्वथैव चुकीचें किंवा असत्य आहे असें ह्मणतां यावयाचें नाहीं; परंतु महाराष्ट्राच्या इतिहासाचें सशास्त्र व सूक्ष्म रीतीनें निरीक्षण करणारास

तें सर्वस्वीं मान्य होईल असें वाटत नाहीं. ग्रांटडफ् साहेबांनीं आपला प्रचंड इतिहास ज्या अस्सल कागदपत्रांच्या साधनांनीं तयार केला, त्यांचें संशोधन व परिशीलन केलें असतां, ग्रांटडफ साहेबांस आमच्या इतिहासाचें अंतरंग बरोबर न कळल्यामुळें त्यांचे हातून अनेक प्रमाद घडले आहेत, व त्यांचा इतिहास पुष्कळ अंशीं अपूर्ण व विसंगत झाला आहे, असें प्रांजलपणें कबूल करणें भाग आहे. परंतु त्याचा दोष ग्रांटडफ् साहेबांस मुळींच देतां येत नाहीं. त्यांनीं, जिंकलेल्या लोकांचा इतिहास लिहावयाचा ह्मणून, जाणून बुजून सत्यापलाप केला आहे, किंवा स्वजातीयांच्या बाहुबलाची मिथ्या प्रौढी वर्णन केली आहे, असा प्रकार मुळींच नाहीं. त्यांचा हेतु, जिज्ञासा आणि प्रयत्न अत्यंत प्रशंसनीय होते ह्यांत तिळमात्र शंका नाहीं. परंतु त्यांस महाराष्ट्रांतील भाषा, धर्म व आचारविचार ह्यांचें परिपूर्ण ज्ञान नसल्यामुळें, स्वाभाविक व अपरिहार्य कारणांमुळें, त्यांच्या इतिहासांत अनेक उणिवी राहिल्या आहेत. ह्या उणिवींचें अल्पसें दिग्दर्शन कै० नीलकंठ जनार्दन कीर्तने ह्यांनीं "ग्रांटडफ्च्या बखरीवरील टीका" नामक एका लेखामध्यें प्रथमतः केलें. परंतु त्यांत त्यांनीं ग्रांटडफ् साहेबांवर मराठ्यांचे जुने कागदपत्र जाळून टाकल्याचा वृथा आरोप केला. तो अगदीं निराधार व असत्य आहे, हें सांप्रत उपलब्ध होत असलेल्या अनेक कागदपत्रांवरून सिद्ध झालें आहे. ग्रांटडफ् साहेबांनीं मिळविलेल्या कागदपत्रांच्या नकला मुंबई येथील "लिटररी सोसायटी" मध्यें ठेविल्या होत्या, असें त्यांच्या इतिहासांतील जागोजागीं नमूद केलेल्या टिपांवरून दिसून येतें. ह्या नकलांचा शोध कै० जस्टिस तेलंग ह्यांनीं, पूर्वींच्या लिटररी सोसायटीची सध्यांची शाखा जी "रॉयल एशियाटिक सोसायटी," तिच्या जुन्या व ह-

स्तलिखित कागदपत्रांत पुष्कळ केला; परंतु ते कागद उपलब्ध झाले नाहींत. तथापि, ग्रांटडफ् साहेबांनीं स्वतः पाहिलेले व आपल्या ग्रंथांत वारंवार नमूद केलेले ऐतिहासिक कागदपत्र साताराच्या छत्रपतींच्या व धावडशीकर ब्रह्मेंद्रस्वामींच्या दप्तरांत उपलब्ध झाले आहेत. ह्यावरून ग्रांटडफ् साहेबांनीं सर्व कागद ज्याचे त्यास परत दिले असावेत, असेंच अनुमान करणें रास्त आहे. सर मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन ह्यांचे चरित्रकार सर कोलब्रुक ह्यांनीं एके ठिकाणीं, ग्रांटडफ् साहेबांच्या दप्तरांत मराठी कागदपत्रांची फक्त एक यादी पाहिल्याचें लिहिलें आहे; व मद्रासचे माजी गव्हरनर सर मौंट स्टुअर्ट ग्रांटडफ् (हे ग्रांटडफ् साहेबांचे चिरंजीव होत) ह्यांनीं ग्रांटडफ्च्या जुन्या दप्तरांत मराठी कागदपत्र मुळींच नसल्याचें कळविलें आहे. ह्यावरून मराठ्यांच्या इतिहासाचे अस्सल कागदपत्र इकडेच ठेऊन, ग्रांटडफ् साहेब फक्त टिपणें व इंग्रजी भाषांतरें घेऊन स्वदेशीं गेले, असें मानणें अधिक सयुक्तिक दिसतें.

ग्रांटडफ् साहेबांच्या इतिहासांत असलेल्या अनेक उणिवी, अस्सल कागदपत्रांच्या कसोटीनें पडताळून पाहण्याचा प्रयत्न, 'काव्येतिहाससंग्रहा'चा जन्म होई तोंपर्यंत, एतद्देशीय विद्वानांनीं केल्याचें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. मध्यंतरीं सर बार्टल फ्रियर, जस्टिस न्यूटन आणि डा० विलसन ह्यांनीं ग्रांटडफ् साहेबांच्या इतिहासाचे अस्सल कागदपत्र व बखरी शोधून काढण्याचा यत्न चालविला होता; व तत्प्रीत्यर्थ मुंबईसरकाराकडून रॉयल एशियाटिक सोसायटीस कांहीं वार्षिक तैनातही देण्यांत आली होती. परंतु ह्या प्रयत्नापासून चांगली फलनिष्पत्ति झाल्याचें दिसत नाहीं. जस्टिस न्यूटन ह्यांस फक्त डफळे, निंबाळकर व प्रतिनिधि ह्या तीन सरदारघराण्यांच्या बखरी व का-

गदपत्र मिळाले होते, व ते त्यांनीं रॉयल एशियाटिक सोसायटी-मध्यें ठेविले होते. परंतु आमच्या दुर्दैवानें तेही तेथून नाहींसे झाले आहेत! तात्पर्य, ग्रांटडफ् साहेबांच्या इतिहासाचें योग्य रीतीनें संशोधन करून, अस्सल कागदपत्रांच्या आधारें त्याची कसोटी पाहण्याचें काम, एतद्देशीय अथवा परदेशीय विद्वानांकडून बरींच वर्षें झालें नाहीं. 'काव्येतिहाससंग्रहा'चा उदय झाल्या-नंतर, जुने कागदपत्र व जुन्या बखरी ह्यांचें प्रकाशन होऊन मराठ्यांच्या इतिहासाचें बरेंच स्पष्टीकरण होऊं लागलें; व त्यावरून मराठ्यांच्या इतिहासाचें खरें अंतरंग अथवा खरें स्वरूप ग्रांट-डफ् साहेबांस बरोबर न समजल्यामुळें, त्यांत अनेक दोष व अनेक उणिवी राहिल्या आहेत, असें इतिहासज्ञ विद्वानांस भासूं लागलें. स्वदेशाचा इतिहास अस्सल कागदपत्रांच्या आधारानिशीं जरी परकीयानें लिहिला, तरी भाषाभिन्नत्व, धर्मभिन्नत्व आणि आचारभिन्नत्व ह्यांच्या योगानें, त्यास त्या इतिहासाचें खरें व यथार्थ ज्ञान होऊन, त्यांतील नाजूक प्रसंग, गुप्त राजकारणें, आणि गूढ मसलती ह्यांचीं सूत्रें बरोबर जुळवितां येणें केवळ अशक्यच आहे. डा० ऑपर्ट ह्यांनीं ह्या संबंधानें प्रांजलपणें असें कबूल केलें आहे कीं, "हिंदुस्थानचा इतिहास हा त्या संबंधाचे विश्वसनीय जुने कागदपत्र उपलब्ध नसल्यामुळें अत्यंत गहन विषय होऊन राहिला आहे. एवढेंच नव्हे, तर तो इतिहास लिहिणारा इतिहासकार प्राच्यभाषाकोविद असणें हें अत्यंत आवश्यक आहे. इतिहासशास्त्र ह्या विषयाचा भाषाविज्ञानशास्त्राशीं अत्यंत निकट संबंध असून तें त्याजवर अवलंबून आहे. ह्मणून, कोणत्याही राष्ट्राच्या देशभाषेचें पूर्ण ज्ञान असल्यावांचून, अथवा निदान ज्या भाषांमध्यें त्या इतिहासाचे अस्सल व महत्त्वाचे कागदपत्र लिहिले आहेत, त्यांचें यथार्थ ज्ञान असल्यावांचून, त्या

राष्ट्राचा इतिहास लिहिण्यास कोणीही मनुष्य योग्य होणार नाहीं. कारण, एक तर मूळचे लेख स्वतः वाचण्याची त्यास शक्ति नसल्यामुळें त्यांतील गुणदोषांचें परीक्षण करण्यास तो असमर्थ असतो. आणि दुसरें, भाषांतरकारांनीं केलेल्या चुका शोधून काढणें त्याच्या आवांक्याबाहेर असतें.*" हें अगदीं अक्षरशः कबूल केलें पाहिजे. ह्या दृष्टीनें पाहिलें असतां, ग्रांटडफ् साहेबांचा इतिहास सशास्त्र, सर्वांगसिद्ध, आणि सत्यपरिपूर्ण असा आहे, असें कधींही मानितां यावयाचें नाहीं; व त्याजवर सर्वस्वीं भिस्त ठेवितां येणार नाहीं.

महाराष्ट्राच्या इतिहासाचें सत्य स्वरूप व त्यांतील गूढ तत्वें ह्यांचें संशोधन करण्याचें काम आमच्या एतद्देशीय विद्वानांनींच केलें पाहिजे. तरच त्याचें खरें हृद्गत आह्मांस कळेल व त्यापासून आमच्या राष्ट्राचें खरें कल्याण होईल. अलीकडे महाराष्ट्राच्या इतिहासासंबंधानें जी अभिरुचि व जी कळकळ व्यक्त होत आहे, व तिचे निदर्शक असे जे प्रयत्न चालू आहेत, ते बरेच

---

* "The subject of Indian history is a very difficult one, not only from the absence of trustworthy ancient records, but also from the necessity—and in this respect it resembles all Asiatic history—that the historian should be an Orientalist. Historical science is strictly allied to, and dependent on, philological science, and without a knowledge of the mother-tongue of a nation, or at all events of the languages in which the original and most important sources of its history are recorded, no person is competent to undertake to write the history of a nation, for, being unable to read the original records himself, first he is not able to judge them critically; and secondly, it is beyond his power to detect any mistakes made by translators."

समाधानकारक आहेत, असें साल्हाद व साभिमान मनानें कबूल केलें पाहिजे. ह्या प्रयत्नांचीं गोड व सुंदर फळें हळहळू दृश्यमान होऊं लागलीं आहेत, ही अत्यंत संतोषाची गोष्ट होय. ह्यांपैकीं अत्यंत प्रशंसनीय फळ महाराष्ट्राच्या इतिहासाचे निःसीम भक्त नामदार न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे ह्यांनीं इंग्रजी भाषेमध्यें लिहिलेला "मराठ्यांचा इतिहास" हा होय. हा इतिहास अत्यंत उदात्त, उज्ज्वल, उन्नत आणि उत्तम विचारांनीं परिपूर्ण भरला आहे. ह्याच एका ग्रंथावरून, मराठ्यांच्या इतिहासाचें ग्रांटडफ्प्रभृति आंग्ललेखकांनीं कसें संकुचित, एकदेशीय आणि अशास्त्र निरूपण केलें आहे, हें उत्तम प्रकारें दिसून येतें. ह्या ग्रंथांतील उन्नत विचार, मनोहर भाषापद्धति, सशास्त्र विवरण आणि तात्त्विक सिद्धांत पाहून प्रत्येक इतिहासवाचकाचें मन तल्लीन झाल्यावांचून राहणार नाहीं. ह्या इतिहासानें मराठ्यांच्या अभ्युदयाचीं खरीं कारणें उत्तम रीतीनें सिद्ध झालीं असून, त्यांपुढें ग्रांटडफ् साहेबांचीं विधानें अपरिपक्व व चुकीचीं ठरतात, हें निराळें सांगावयास नकोच आहे. अर्थात् स्वदेशीय विद्वानांच्या निरीक्षणाचें फल असेंच सुंदर व सरस निष्पन्न व्हावें हें साहजिक आहे.

ग्रांटडफ् साहेबांचीं मराठ्यांच्या संबंधाचीं असत्य विधानें न्यायमूर्ति रानडे ह्यांनीं उत्तम प्रकारें खोडून काढिलीं आहेत; व मराठी राज्याची संस्थापना व मराठ्यांचा अभ्युदय कसा झाला हें फार तात्त्विक दृष्टीनें सिद्ध करून दाखविलें आहे. त्यांच्या इतिहासाचा "जमीन कशी तयार केली?" ह्मणून जो दुसरा भाग आहे, तो फार मनन करण्यासारखा आहे. ह्या भागाची व ग्रांटडफ्च्या इतिहासांतील मराठ्यांच्या पूर्व वृत्तांताची तुलना केली, तर जमीनअस्मानाचें अंतर दृष्टीस

पडेल. ग्रांटडफ् साहेबांस मराठ्यांचा उदय कसा झाला, त्यांची संघशक्ति केव्हांपासून तयार होऊं लागली, त्यांची राष्ट्रघटना कशी घडून आली, ह्याची बरोबर रीतीनें छान करितां आली नाहीं. त्यामुळें त्यांना, मराठ्यांचा अभ्युदय आकस्मिक गोष्टी घडून आल्यामुळें झाला, अशी समजूत करून घेणें भाग पडलें. त्यांनीं, एके ठिकाणीं, मराठ्यांच्या उत्कर्षास सह्याद्रि पर्वतावरील दावानलाची उपमा दिली आहे. ह्मणजे, ज्याप्रमाणें डोंगरांतील वणवा आकस्मिक पेट घेतो, त्याप्रमाणें मराठे दैवगतीनें आकस्मिक उदय पावले, असा त्यांच्या लिहिण्याचा आशय आहे; व पुष्कळ एतद्देशीय व परदेशीय इतिहासकारांनीं बहुतकरून अशींच विधानें केलीं आहेत. परंतु वास्तविक पाहूं गेलें असतां, मराठ्यांचा उदय दावानलाप्रमाणें आकस्मिक कारणांनीं घडून आलेला नसून, त्याची घटना शिवाजी महाराज अवतीर्ण होण्यापूर्वीं दोन तीन शतकें चालली होती. त्या कालांतील मराठ्यांचा इतिहास शोधून काढून त्याचें मनन करणें फार आवश्यक आहे. शिवाजी निर्माण होण्याच्या अगोदर तीन शतकेंपर्यंत बहुतेक महाराष्ट्रदेश मुसलमानांच्या ताब्यांत होता. त्या वेळींच मराठ्यांच्या भावी राष्ट्राचे घटकावयव बनत चालले होते. ते घटकावयव ह्मणजे मुसलमानी अमदानींतील मराठे सरदार हे होत. न्यायमूर्ति रानडे ह्यांनीं, स्थूल मानानें, मुसलमानी अमलांत मराठ्यांच्या राष्ट्रघटनेस व तिच्या प्रगतीस कोणकोणतीं, नैसर्गिक, राजकीय, धार्मिक आणि सामाजिक करणें साहाय्यभूत झालीं, त्यांची संक्षिप्त यादी दिली आहे. त्यांचा सारांशः—१ दक्षिणेंतील मुसलमान लोकांचें दिल्लीच्या अफगाण, गिलजी, तुर्क, युझबेग, मोंगल, इत्यादि कट्ट्या धर्माभिमानी जातीपासून दूरीकरण. २ ब्राह्मणी

राज्यसंस्थापक हसन गंगू ह्याचें हिंदुलोकांविषयीं चांगलें मत व त्याच्या कारकीर्दींत झालेलें हिंदूंचें प्राबल्य. ३ त्यामुळें वसुली खात्यांत व खजिन्याच्या कामांत हिंदु व कायस्थ व पुढें दक्षिणी ब्राह्मण व परभू ह्यांचा झालेला प्रवेश. ४ हिंदूंच्या हातीं राज्याच्या हिशोबाचा सर्व अधिकार आल्यामुळें, ब्राह्मणी राज्यानंतर विजापूर, वऱ्हाड, अहमदनगर, बेदर व गोवळ-कोंडा येथील दप्तरांत झालेला मराठी भाषेचा शिरकाव. ५ वि-जयनगरच्या हिंदुसाम्राज्याचें तालिकोटच्या लढाईपर्यंत दक्षिणें-तील मुसलमानी राजांवर असलेलें विलक्षण वर्चस्व. ६ विजय-नगराच्या हिंदुसाम्राज्यामुळें हिंदु व मुसलमान ह्यांच्या शक्तीचें समतोलन होऊन, मराठे शिलेदारांस मुसलमानी दरबारांत मिळालेली बढती. ७ मुसलमानी बादशाहांचे हिंदूंच्या मुलींशीं झालेले शरीरसंबंध व त्यामुळें हिंदूंची त्यांच्या दरबारांत बसलेली छाप. ८ ज्या मूळच्या हिंदु लोकांचें धर्मांतर होऊन ज्यांना रा-जपद मिळालें, त्यांचें स्वजातियांविषयींचें उत्कट प्रेम. ९ ह्या सर्व कारणांमुळें दक्षिणेंतील मुसलमानी बादशाहांच्या ठिकाणीं आलेलें हिंदुधर्माविषयींचें सहिष्णुत्व, आणि त्या योगानें सर्व हिंदु लोकांस राजकीय, धार्मिक आणि सामाजिक गोष्टींत मिळालेल्या सवलती, अधिकार व उत्तेजन. ह्या नऊ कारणांत महाराष्ट्राची नैसर्गिक देशस्थिति व लोकस्वभाव ह्यांची अनुकूल भर पडून विलक्षण कार्य घडून आलें, असा न्यायमूर्ति रानडे ह्यांच्या ह्या भागाचा मथितार्थ आहे. परंतु ह्या विषयाचें जास्त स्पष्टीकरण होऊन बरोबर समजूत पटण्यास, मुसलमानी अंमलांतील मराठ्यांच्या इतिहासाचें अधिक अध्ययन केलें पाहिजे. न्यायमूर्ति रानडे ह्यांचा इतिहास वाचल्यानंतर मुसलमानी अमदानींतील मरा-ठ्यांची माहिती समजून घेण्याकडे मनाची नैसर्गिक धांव जाते.

परंतु आजपर्यंत उपलब्ध झालेल्या कागदपत्रांत ही माहिती फारशी – किंबहुना मुळींच – सांपडत नसल्यामुळें विशेष निराशा वाटते. तथापि, अशा स्थितींतही उदासीन न होतां, केवळ जिज्ञासापूर्तीसाठीं, मुसलमानी अमदानींतील मराठ्यांची माहिती गोळा करण्याचा थोडा बहुत प्रयत्न चालविला आहे. त्या प्रयत्नांत जें थोडें बहुत फल आलें आहे, तें प्रकृत लेखांत सादर करावयाचें योजिलें आहे.



# भाग २ रा.



## महाराष्ट्र व मराठे.

मुसलमानी अमदानींतील मराठ्यांची माहिती देण्यापूर्वी महाराष्ट्र व मराठे ह्यांची थोडीशी व्याख्या केली पाहिजे. दक्षिणच्या प्राचीन भूगोलामध्यें द्रविड, कर्नाटक, आंध्र अथवा तेलंगण, गोंडवण आणि महाराष्ट्र असे पांच भाग केलेले आहेत. ह्याच भागांचे मुसलमानी अमलांत पुढें साडेसहा सुभे झाले. ह्या सुभ्यांचीं नांवें:– १ सुभा दारुलजफर ऊर्फ विजापूर. २ महमदाबाद ऊर्फ बेदर. ३ वऱ्हाड एलिचपूर ऊर्फ गावेलपूर ऊर्फ आळजपूर. ४ खुजस्तेबुनियाद ऊर्फ दौलताबाद ऊर्फ औरंगाबाद. ५ खानदेश उर्फ बऱ्हाणपूर. ६ फरखुंदेबुनियाद ऊर्फ हैदराबाद भागानगर. ह्या सहा सुभ्यांशिवाय अर्धा सुभा नागपूर अथवा मध्यप्रांत होय. ह्याच सर्व सुभ्यांमध्यें कमजास्त प्रमाणानें दक्षिणच्या पांच विभागांची वांटणी झालेली आहे. ह्यांपैकीं महाराष्ट्रदेश ह्याची सीमाः–उत्तरेस विंध्याद्रि व सातपुडा हे पर्वत असून, त्याची नांदोदपासून वैनगंगेपर्यंत लांबी आहे. पश्चिमेकडे सह्याद्रि व आरबीसमुद्र ह्यांची सीमा असून, दक्षिणेकडे गोमांतक प्रांतापर्यंत त्याचा निमुळता आकार होत गेला आहे. पूर्वेकडे माहुरापासून तों दक्षिणेकडे गोव्यापर्यंत एक नागमोडी रेषा काढली, ह्मणजे ह्या देशाचा काटकोन त्रिकोणाकृति आकार दृष्टीस पडतो. दमणपासून कारवारापर्यंत सह्याद्रि व समुद्र हा ह्या त्रिकोणाचा पाया; सातपुड्याच्या आरंभापासून तों तहत गोदावरी नदीच्या मुखापर्यंतचा प्रदेश ह्याची लंब बाजू; व गोदावरीच्या मुखापासून तों कारवारापर्यंत मराठी भाषा प्रचलित असणारा प्रदेश हा त्रिकोणाचा कर्ण;

अशा स्वरूपाचा हा प्रदेश आहे. ह्यांत कोंकण, घांटमाथा व देश असे तीन उपभाग आहेत. महाराष्ट्रप्रांत मुसलमानी अमलांत गेल्यानंतर इ. स. १४७८ सालीं, महमदशाहानामक दुसऱ्या ब्राह्मणी राजाच्या कारकीर्दींत, त्याचा प्रधान खाजा जहान ह्यानें, दक्षिणचे विजापूर, अहसनाबाद, दौलताबाद, जुन्नर, राजमहेंद्री, वारांगळ, गावेल आणि माहूर असे आठ भाग केले. त्या वेळीं महाराष्ट्राच्या नजीकच्या सुभ्यांमध्यें तो प्रांत कमजास्त प्रमाणानें वांटला गेला. नंतर १५२६ सालीं ज्या वेळीं ब्राह्मणी राज्य मोडून त्याच्या आदिलशाही, कुतुबशाही, इमादशाही, निजामशाही, आणि बरीदशाही अशा पांच शाखा निर्माण झाल्या, त्या वेळीं पुनः महाराष्ट्र देश ह्या पांच शाखांमध्यें विभागला गेला. त्यानंतर ज्या राजकीय घडामोडी झाल्या, त्यांमध्यें पुनः त्याचें निरनिराळ्या तऱ्हेनें वर्गीकरण झालें. तथापि, ह्या सर्व प्रांतांमध्यें मराठ्यांचा एकसारखा संचार असून, मुसलमानी अमलामध्यें ह्या प्रशस्त रंगभूमीवर, त्यांनीं आपल्या राजकारणकुशलत्व, बुद्धिवर्चस्व आणि पराक्रमपटुत्व इत्यादि गुणांचें अद्वितीय प्रदर्शन करून दाखविलें. ह्मणून महाराष्ट्राची देशमर्यादा लक्षांत ठेवणें आवश्यक आहे. त्यांतही विशेषेंकरून सह्याद्रीचा घांटमाथा व त्याचीं दरींखोरीं हीं विशेष ध्यानांत ठेविलीं पाहिजेत. कारण, येथेंच महाराष्ट्रसाम्राज्यरूपी विस्तीर्ण तरूचें मूळ बीजारोपण होऊन त्याचा उद्गम झाला. क्याप्टन ब्रूक्स ह्यांनीं, "पुण्यापासून वारणेपर्यंतचा डोंगराळ प्रांत—ह्मणजे कोंकण घांटमाथा—ह्यांत हिंदुस्वातंत्र्याचें बीज अगोदरपासूनच मुरत घातलें होतें. त्याचा प्रचंड वृक्ष लवकरच निर्माण होऊन त्याच्या विस्तीर्ण शाखा हिंदुस्थानच्या दूरवरच्या कोनाकोपऱ्यापर्यंत जाऊन पसरल्या." असें एके ठिकाणीं ह्मटलें आहे. तें अगदीं बरोबर आहे. अर्थात्

स्वातंत्र्यसंवर्धक व निसर्गतःच राष्ट्रघटनेस परिपोषक अशा प्रांतांत अवतीर्ण झालेले लोक हे मराठे होत.

"महाराष्ट्र" अथवा "मराठा" हें नांव विशिष्टगुणदर्शक व प्राचीन आहे. हें नांव कसें उत्पन्न झालें ह्याबद्दल निरनिराळ्या विद्वानांचीं निरनिराळीं मतें आहेत. प्रकृत स्थळीं त्याबद्दल विशेष वाटाघाट करण्याची आवश्यकता नाहीं. ह्या नांवाची उपपत्ति डा० भांडारकर व मि० फ्लीट ह्या दोन विद्वानांनीं उत्कृष्ट रीतीनें केली आहे. डा० जॉन विल्सन ह्यांनीं महारांचें राष्ट्र तें महाराष्ट्र अशी व्युत्पत्ति केली आहे. परंतु डा० भांडारकर ह्यांनीं राष्ट्रकूट या शब्दापासून राष्ट्रिक, रठ्ठ आणि महारठ्ठ अशी परंपरा जुळवून, मराठा ह्या शब्दाची व्युत्पत्ति तयार केली आहे. मराठा हा महारठ्ठ ह्या शब्दाचाच अपभ्रंश आहे, असें मानण्यास आणखीही पुष्कळ आधार आहे. रठ्ठ राजांचें बेळगांवप्रांतामध्यें इ. स. ८७५–१२५० पर्यंत राज्य असल्याचें मि० फ्लीट ह्यांनीं ताम्रपत्रावरून सिद्ध केलें आहे. ह्यावरून मराठ्यांचे पूर्वज महाराष्ट्रांत फार प्राचीन कालापासून आहेत, असें ह्मणणें भाग पडतें. पुणें जिल्ह्यांतील भाजें व कार्लें येथील कोरींव लेण्यांमधील शिलालेखांतही महारठ्ठी हा शब्द आढळून येतो. त्यावरून इसवी सनाच्या पहिल्या किंवा दुसऱ्या शतकापासून महारठ्ठांच्या नांवाचा उल्लेख दिसतो. सिलोनी लोकांचा 'महावंसो' ह्मणून जो इ. स. ४८० च्या सुमाराचा लिहिलेला ग्रंथ आहे, त्यांत दोन वेळां महारठ्ठ लोकांच्या देशाचा उल्लेख आला आहे. विजापूर जिल्ह्यांतील अइहोल अथवा ऐवळ्ळी येथील शिलालेखावरून, चालुक्य कुळांतील प्रख्यात राजा दुसरा पुलिकेशी ( इ. स. ६१०–इ. स. ६३५ ) ह्याकडे तीन महराठ्ठे यांचें ह्मणजे ९९००० हजार गांवांचें सार्वभौमत्व होतें, असें व्यक्त होतें.

सुप्रसिद्ध चिनी प्रवासी ह्यूवेन त्संग ( ६२९–६४५ ) ह्यानें आपल्या प्रवासवृत्तांत महाराष्ट्रदेशाचें व तेथील लोकांचें जें वर्णन लिहिलें आहे, तें त्यांस अगदीं अनुरूप असें आहे. इ. स. १०२० च्या सुमारास आरबी भूगोलवेत्ता अल्बिरुनी ह्यानें नर्मदानदीच्या दक्षिणेकडील देशाचा मऱ्हाटदेश अशा नांवानें उल्लेख केला आहे. इ. स. १३२० मध्यें आलेला फ्रेंच प्रवासी जोर्डानस ह्यानें मराठ्यांचें राष्ट्र फार प्रबल होतें, असें लिहिलें आहे. आणि ह्यानंतर, इ. स. १३४० सालीं आलेला आफ्रिकन प्रवासी इब्न बटुटा ह्यानें, दौलताबाद ऊर्फ देवगिरी येथील लोक मराठे असून, तेथील अमीरउमराव ब्राह्मण होते, असें वर्णन केलें आहे. त्यावरून मराठे हें नांव फार प्राचीन असून, त्याचें प्राचीनत्व त्यांच्या अंगीं असलेल्या विलक्षण सजीवत्वाचें सूचक होय असें ह्मणण्यास हरकत नाहीं. फेरिस्तानें इ. स. १२९०–१६०० पर्यंत दक्षिणचा इतिहास लिहिला आहे, त्यांत त्यानें जागोजाग मराठ्यांचा उल्लेख केला आहे.

देवगिरीच्या यादवांपासून मराठ्यांचा नामनिर्देश पुष्कळच आढळतो. परंतु मुसलमानी अमलांत, नाईक व बर्गे ह्या नांवांत मराठ्यांचा समावेश होत होता, असें दिसतें. इ. स. १३७० सालीं, नाइकांचा प्रमुख सरदार जो जाधव मराठा ह्यानें दौलताबाद येथें बंड करून, पैठण येथें पुष्कळ सैन्य जमविलें, ह्मणून स्कॉट साहेबांनीं फेरिस्ताच्या इतिहासाच्या भाषांतरांत उल्लेख केला आहे. त्याचप्रमाणें ब्राह्मणी राज्याच्या अमदानींत कांहीं बर्गे सरदार स्वतंत्र होते, व ते मुळींच बादशाहास खंडणी देत नसत, असा उल्लेख सांपडतो. ह्या सरदारांमध्यें जालना व बागलाण येथील मराठे राजांचा निर्देश आहे. इ. स. १४९० मध्यें ब्राह्मणी राज्याचा लय झाल्यानंतर, अहमदनगर व विजा-

पूर ह्या बादशाहांच्या अमदानीमध्यें, एक दोन मराठे राजे साधारण स्वतंत्र होते; कोणी सार्वभौमसत्तेस सैन्याची मदत देऊन आपल्या जहागिरी उपभोगीत होते; कोणी बादशाही सरदारांची नौकरी पत्करून त्यांच्या हाताखालीं मनसबदारी, फौजदारी, वगैरे अधिकार चालवीत होते. ह्या लोकांस बादशाहाकडून देशमुख, सरदेशमुख, नाईक, राव आणि राजे अशा किताबती मिळत होत्या. विजापुरच्या अमलांत तर ह्या किताबतींची मजल अमीर-उल्-उमराव ह्मणजे सर्व उमरावांत श्रेष्ठ ह्या महत्त्वाच्या दर्जापर्यंत पोहोंचली होती. अर्थात् ही उच्चप्रतीच्या मराठ्यांची स्थिति झाली. त्यांच्या खालच्या वर्गांतले जे लोक होते, त्यांचा पायदळ व घोडेस्वार ह्यांमध्यें भरणा झाला होता. ह्या लोकांना विशेषेंकरून बर्गे असें ह्मणत असत. बर्गे आणि बारगीर हे शब्द एकाच अर्थी मराठ्यांचें द्योतक आहेत, व त्यांचा अर्थ घोडेस्वार अथवा शिलेदार असा आहे, असें कित्येकांचें मत आहे. परंतु बारगीर व शिलेदार ह्यांमध्यें अंतर असून, बारगीर हा शब्द शिलेदाराचा लघुत्वदर्शक आहे, व हें नांव मुसलमान शिलेदारांनीं मराठी घोडेस्वारांस क्षुद्रबुद्धीनें दिलें आहे, असें ग्रांटडफ् साहेबांचें मत आहे. बर्गे हा शब्द मराठ्यांस मुसलमानांनीं अनेक वेळां लाविलेला आहे. मिरात-इ-अहमदी ह्या ग्रंथामध्यें बागलाण व उत्तर नासिक येथील मराठे सरदारांस बर्गे असें नांव दिलेलें आहे. फेरिस्तानें इ. स. १५४९ व इ. स. १५६० ह्या सालीं विजापुरच्या ताब्यांतील घोडेस्वारांच्या पलटणीस बर्गे ह्या नांवानें संबोधिलें आहे. विजयनगरच्या राज्यांतील सैन्यास व जहागिरदारांस हें नांव अनेक वेळां दिलेलें सांपडतें. त्या अर्थीं तिकडून तें मुसलमानांनीं घेतलें असावें, असें कित्येकांचें मत आहे. वाकियत-इ-जहानगिरी ह्या ग्रंथामध्यें, इ. स. १६१३ सालीं

जहानगिरानें अहमदनगरच्या मराठे लढवय्यांस बर्गे असेंच नांव दिलें आहे. आणि, ह्याच ग्रंथांत, इ. स. १६१६ सालीं, अहमदनगरच्या बादशाहींतील बर्गे मोठे काटक व शूर लोक होते, आणि जाधवराव हा बर्ग्यांचा प्रसिद्ध सरदार होता, असा उल्लेख आहे. ह्या बर्गे शब्दाच्या सैन्य व सरदार अशा द्व्यर्थी उपयोगावरून, एका विद्वान् गृहस्थानें, हा शब्द 'वडुग' (Northern) ह्या उत्तरदिशावाचक तामिल शब्दावरून 'बडगे' असा शब्द झाला, व त्याचा अपभ्रंश 'बर्गे' असा झाला, असा तर्क काढिला आहे. तो ग्राह्य मानिला, तर उत्तरेकडून ह्मणजे महाराष्ट्रांतून कर्नाटकांत गेलेले लोक ते बर्गे, अशीही कल्पना करण्यास जागा होईल. ह्या बर्गे लोकांचाच इतिहास पुढें सांगावयाचा आहे, ह्मणून ह्या शब्दाची थोडीशी व्युत्पत्ति करणें अवश्य वाटलें.

बर्गे ह्या शब्दाप्रमाणें मुसलमानी अमदानींतल्या मराठ्यांस नाईकवाडी असें नांव पुष्कळ ठिकाणीं योजिलेलें आहे. फेरिस्तानें नाईकांचा मुख्याधिकारी गोविंददेव जाधव होता, असें एके ठिकाणीं लिहिलें आहे. त्याच्याच इतिहासांत जगदेवराव जाधवाच्या हाताखालीं नाईकवाडी सैन्य पुष्कळ होतें, असें पुनः वर्णन आहे. त्याचप्रमाणें विजयनगरच्या हिंदू राजांचे पदरीं व गोवळकोंडा येथील मुसलमानी दरबारांत, नाईकवाडी सैन्य असल्याबद्दलचे उल्लेख वारंवार दृष्टीस पडतात. ह्यावरून पायदळ (Infantry) सैन्यास नाईकवाडी असें नांव असावें असें दिसतें. ले० कर्नल साईक्स नामक कंपनीसरकारच्या एका जुन्या अधिकाऱ्यानें "दक्षिण प्रांतासंबंधाची कांहीं हिशोबी माहिती" नामक लेखामध्यें, नाइकवाडी ह्मणजे नाईकांच्या ताब्यांतील कांहीं गांवांचा समुदाय, अशी व्याख्या दिली आहे. पूर्वी ८४ गांवांची एक देशमुखी समजत असत; व तिच्या हाताखालीं कांहीं ना-

ईकवाड्या असत. सरदेशमुख हा त्या प्रांताचा मुख्य सुभेदार असे. मुख्य राजा, त्याच्या खालीं सरदेशमुख, नंतर नाईक, नंतर पाटील व चौगुला, अशी ही मालिका असे. हे लोक सर्व मराठे असत. ह्यांच्याच बरोबरीनें सरदेशपांडे, देशपांडे, व कुळकर्णी, ही दुसरी ब्राह्मण मंडळींची मालिका असे. ह्या पूर्वीच्या ग्रामरचनेचें स्वरूप मुसलमानांनीं विशेष बदललें नाहीं. देशमुख देशपांड्यांचें महाराष्ट्रामध्यें पूर्वी फार प्राबल्य असे. त्याचें कारण त्यांचा अधिकार व प्राचीनत्व हें होय. ह्यांच्याच वर्गातले नाईक लोक ह्यांनीं लढाऊ पेशा धारण केला, ह्मणून मराठ्यांना नाईकवाडी असें नांव मुसलमानी अमलांत प्राप्त झालें असावें असें दिसतें. हे नाईकवाडी लोक हवालदार, किल्लेदार वगैरे महत्पदावर चढले होते. ह्यांचा उल्लेख जुन्या कागदांतून क्वचित् क्वचित् दृष्टीस पडतो. घाटग्यांच्या एका जुन्या बखरीमध्यें नाईकवाडी लोकांचीं पुष्कळ नांवें आलीं असून, सातारा किल्ल्याचा अधिकार इ. स. १६२६ मध्यें, मंगाजी नाईक नाईकवाडी ह्या माणसाकडे होता असा उल्लेख आहे. त्याचप्रमाणें पुरंदर किल्ल्याचे अधिकारी निळो निळकंठ ह्यांसही नाईकवाडी असें नांव दिलेलें आढळतें. ह्यावरून बर्गे ह्मणजे घोडेस्वार व नाईकवाडी ह्मणजे पायदळ पलटणीचे लोक, किंवा किल्ल्यावरील अधिकारी लोक, असा स्थूलमानानें अर्थ करण्यास हरकत नाहीं. अर्थात् हे दोन्ही मराठे असल्यामुळें मुसलमानी अमलांत हे दोन्ही शब्द बहुतकरून मराठ्यांस लावीत असत.

हेच बर्गे व नाईकवाडी लोक हे महाराष्ट्रसाम्राज्याच्या भव्य इमारतीचा मूळ आधारस्तंभ होत. ह्या लोकांची पूर्वपीठिका पाहिली असतां, हे अस्सल क्षत्रिय असून, महाराष्ट्रांत ह्यांची वसाहत फार प्राचीन काळापासूनची असावी असें दिसून

येईल. ह्यांच्या प्राचीन इतिहासाचा शोध केला असतां, हे लोक एके वेळीं राज्यवैभव व स्वातंत्र्यसुख अनुभवलेल्या लोकांचे वंशज होते, असें ह्मटलें तरी चालेल. ह्याच लोकांनीं, मुसलमानी अमदानीमध्यें, आपल्या अंगचें पराक्रमतेज व्यक्त करून आपलें डोकें वर उचललें; आणि महाराष्ट्रराज्यसंस्थापकांस पुढील मार्ग सोयीचा करून ठेविला. हे लोक महाराष्ट्रांत आज मितीपर्यंत नामशेष असून, बऱ्यावाईट स्थितींत आपलीं वतनें व इनामें उपभोगीत आहेत. ह्यांपैकीं सुमारें नऊ घराण्यांचा नामोल्लेख ग्रांटडफ् साहेबांनीं आपल्या इतिहासांत केला आहे. त्यांचीं नांवें येणेंप्रमाणेंः—चंद्रराव मोरे, राव नाईक निंबाळकर, झुंजारराव घाटगे, राव माने, घोरपडे, डफळे, सांवत बहादूर, राव जाधव आणि राजे भोंसले. ह्यांशिवाय, शिर्के, महाडीक, मोहिते, गुजर, सुर्वे इत्यादि घराण्यांचाही यांत समावेश केला पाहिजे. मराठ्यांची शाहाण्णव कुळी ह्मणजे ९६ कुळें समजतात. परंतु त्यांच्या शाखा व उपशाखा पुष्कळ वाढून त्यांचीं उपनांवेंही फार झालीं आहेत. त्यांच्या उपनांवांची संख्या ५०० पर्यंत आहे. शाहाण्णव कुळींतील चाळके, माने, कदम, कचरे, जाधव, साळुंखे, मोरे, रट्ठे, शिर्के, मालुसरे, गुर्जर, हीं नांवें चालुक्य, मानव्य, कदंब, कलुचरी, यादव, सोलांकी, मौर्य, रट्ठे, श्रीक, मल्लसूर, गुर्जर ह्या महाराष्ट्रांतील पुरातन लहान मोठ्या घराण्यांच्या नांवांचा अपभ्रंश आहेत. भोंसले हें नांव मात्र उदेपुरच्या शिशोदे वंशांतील भोंसाजी महाराण्यापासून निष्पन्न झालें, किंवा भोजनामक दक्षिणेंतील राजापासून भोजे, भोंसके आणि भोंसले अशा रीतीनें अपभ्रंश होऊन तयार झालें, ह्याबद्दल अद्यापि संशय आहे. रा. राजवाडे ह्यांनीं, भोंसले हे रजपूत क्षत्रिय नसून पुरातन महाराष्ट्रांतील क्षत्रियवर्गांपैकीं होत, असें सिद्ध करून दाखवि-

ण्याचा नवीन यत्न केला आहे. परंतु त्याचा निर्णय अद्यापि झालेला नाहीं. ह्या प्राचीन घराण्यांच्या इतिहासाचें संशोधन केलें असतां, मराठी राज्याच्या संस्थापनेचा उगम कसा झाला हें उत्तम प्रकारें सिद्ध होईल.

डा० भांडारकर ह्यांनीं दक्षिणचा इतिहास देवगिरीच्या यादव-कुलापर्यंत ह्मणजे अल्लाउद्दीन खिलजीच्या दक्षिणेंतील स्वारीपर्यंत आणून पोहोंचविला आहे. ही स्वारी होऊन दक्षिणेंत मुसलमानांचा अंमल संस्थापित झाल्यामुळें, महाराष्ट्राचें स्वातंत्र्य बहुतेक नष्ट झालें; व तेथील हिंदु लोकांस परराज्यसत्तेचें जूं आपल्या मानेवर घेणें भाग पडलें. अर्थात् स्वातंत्र्य, स्वराज्य व स्वधर्म ह्यांस मुकलेल्या लोकांचा कांहीं काळपर्यंत निराळा इतिहास असणेंच शक्य नाहीं. कोणतेंही राष्ट्र परकीय सत्तेखालीं गेलें, ह्मणजे त्यांत पुनः नवीन जीव, नवीन जोम, नवीन अभिमान उत्पन्न होईतोंपर्यंत, तें निर्माल्यवत् बनतें. अर्थात् अशा लोकांचा इतिहास कांहीं काळपर्यंत महत्त्वाचा नसणार, हें उघड आहे. जेव्हां ह्या लोकांत धर्मजागृति करणारे कवि व साधुसंत निर्माण झाले, व जेव्हां त्यांनीं स्वाभिमानाची ज्योति प्रज्वलित केली, तेव्हांच त्यांच्यामध्यें विशिष्ट प्रेरणा होऊन ते पुढें सरसावले. ह्या काळापासूनच त्यांच्या खऱ्या इतिहासास प्रारंभ झाला. हा काळ ह्मणजे शिवाजी निर्माण होण्याच्या अगोदर सुमारें तीनशें वर्षें होय. ह्या तीनशें वर्षांच्या इतिहासाची माहिती ग्रांटडफ् साहेबांनीं अगदीं त्रोटक दिली आहे. त्यामुळें त्या काळाचा मराठ्यांचा स्वतंत्र इतिहास मुळींच उपलब्ध नाहीं. मुसलमान इतिहासकार फेरिस्ता ह्यानें, ब्राह्मणी व मुसलमानी राज्यांचा जो इतिहास लिहिला आहे, त्यांत त्या काळच्या मराठे लोकांचा क्वचित् क्वचित् उल्लेख केलेला आहे. परंतु त्यांतील माहिती

फारच अपुर्ती, संकुचित व अस्पष्ट अशी आहे. ह्या उत्तरेकडून आलेल्या किंवा महाराष्ट्रांत उदय पावलेल्या क्षत्रिय घराण्यांची माहिती, महाराष्ट्राच्या इतिहासाचें अध्ययन करूं इच्छिणारास अत्यंत महत्त्वाची आहे. युरोपियन इतिहाससंशोधकांसही ह्या प्राचीन क्षत्रियांचीं प्राकृत नांवें कशीं बनलीं, हा मोठा महत्त्वाचा प्रश्न वाटतो; व त्यांच्या घराण्यांची माहिती कळण्याची विशेष जिज्ञासा वाटते. इ. स. १८६९ सालीं, रॉयल एशियाटिक सोसायटीचे प्रेसिडेंट डा० विल्सन ह्यांनीं, ह्या क्षत्रिय घराण्यांचीं प्राचीन नांवें बदलून त्यांचीं प्राकृत रूपें कशीं झालीं, ह्याबद्दल आश्चर्य प्रदर्शित करून, ह्या घराण्यांची माहिती प्रसिद्ध होईल तर फार चांगलें होईल, असे उद्गार काढिले होते.* परंतु ही जिज्ञासा तृप्त होणें तूर्त तरी शक्य नाहीं. तथापि, ह्या घराण्यांच्या इतिहासाचा शोध लागावा व त्यांचें महत्त्व लक्षांत यावें ह्या हेतूनें, कांहीं प्रसिद्ध व नामांकित अशा महराष्ट्रांतील क्षत्रिय घराण्यांचा संक्षिप्त वृत्तांत, इतिहासप्रिय रसिक जनांस सादर करावयाचें योजिलें आहे. हा वृत्तांत विशेषेंकरून मुसलमानी अमदानींतील आहे; ह्मणून सामान्यतः प्रकृत निबंधास "मुसलमानी अमदानींतील मराठे सरदार" असें नांव दिलें आहे.

---

* "It is a curious thing to notice the existence of Kshatriya tribal names among the higher classes of the Mahratta people, though in a prakritized form, as *Jadhava* exemplified in *Yadava*, the name of the last Hindu dynasty at Devagiri, now Daulatabad; *Pawar* from *Parmar*, a distinguished Kashatriya tribe; still in existence as a royal race. Shirke the highest name among the Mahrattas, possibly from the Chalukya (now Salunki) both north and south. If any light can be thrown on the Kshatriyas who reached the south, it will be valuable, as but little is known of them except through their dynastic lists."

# भाग ३ रा.



## मुसलमानी अमदानी.

मुसलमानी अमदानींतील मराठे सरदारांचा वृत्तांत सांगण्यापूर्वी, मुसलमानी अमदानीचा काल व तिची थोडीशी माहिती सांगणें अवश्य आहे. परंतु तसें केलें तर ह्या विषयाची मर्यादा उल्लंघल्यासारखें होईल, ह्मणून फक्त मुसलमानी अमदानीचा काल व त्यांतील कांहीं बादशाहांची संक्षिप्त हकीकत येथें दाखल करितों. ह्या बादशाहांची विस्तृत माहिती कोणास पहावयाची असेल तर इंग्रजीमध्यें फेरिस्ताचा ग्रंथ पहावा; किंवा मराठी भाषेमध्यें बडोद्याचे रा. सरदेसाई ह्यांनीं लिहिलेली "मुसलमानी रियासद" पहावी; ह्मणजे ह्या विषयाची बरीच माहिती मिळेल.

दक्षिणेमध्यें पहिलें मुसलमानी राज्य ह्मणजे ब्राह्मणी राज्य होय. ह्याचा संस्थापक हसन गंगो नामक, महमद तघलघ बादशाहाचा एक सरदार होता. हा मूळचा गंगोपंडित नुजुमू ह्मणजे ज्योतिषी ह्याच्या जवळ गुलाम होता. गंगोपंडित हा बादशाहाजवळ प्रसिद्ध ज्योतिषी असल्यामुळें, हसन ह्याचा बादशाही दरबारांत प्रवेश होऊन, त्यास त्याच्या पराक्रमावरून सरदारी मिळाली. पुढें बादशाहा दक्षिणेंत आल्यानंतर त्यानें दौलताबाद येथील सुभेदारीवर त्यास ठेविलें. परंतु पुढें बादशाहाच्या जुलुमामुळें त्याचें व बादशाहाचें वैर उत्पन्न होऊन तो स्वतंत्र झाला; व त्यानें इ. स. १३४७ सालीं दक्षिणेंत नवीन राज्य संस्थापित केलें. ह्याचें नांव झुफरखान असेंही होतें. परंतु त्यानें सुलतान अल्लाउद्दीन हसन गंगो बामणी असें नांव धारण केलें. त्याचा शिक्का " बंदे सुलतानी हजरत सुभानी अल्लाउद्दीन

हसन गंगो बामणी" असा होता. ह्याचा उदय गंगोपंडिताच्या साहाय्यामुळें झाला, ह्मणून त्यानें त्यास दक्षिणेंत आपल्याबरोबर आणिलें; आणि कृतज्ञबुद्धीनें आपल्या शिक्क्यांत त्याचें नांव दाखल करून, त्यास आपल्या नवीन राज्याच्या जमाखर्चाचें काम दिलें. ग्रांटडफ् साहेबांनीं "गंगो" ह्या नांवाच्या ठिकाणीं "कांगो" असें नांव लिहिलें आहे; आणि तो शब्द "कानगो" ह्मणजे देशपांडे ह्या शब्दापासून निघाला, असा तर्क केला आहे. परंतु तो चुकीचा आहे. गंगोपंडित हें नांव हसनच्या मालकाचें असून तो ब्राह्मण होता, ह्मणून त्यानें आपल्या नांवास गंगो ब्राह्मणी अथवा बामणी असें कृतज्ञबुद्धीनें उपपद[1] जोडिलें. मुसलमान व इंग्रजी इतिहासकारांनीं "ब्राह्मणी" "बामणी" ह्या शब्दांऐवजीं "बहामिनी" शब्द योजिला आहे. असो. ज्या गंगोपंडितामुळें मुसलमानी बादशाहींत हिंदूंचा प्रवेश झाला, त्याचें नांव मराठ्यांच्या इतिहासांत असणें अत्यंत अवश्य आहे.

हुसेन गंगो ब्राह्मणी ह्यानें कोंकण घांटमाथा खेरीज बहुतेक महाराष्ट्रदेश आपल्या ताब्यांत घेतला, व तेथील जुने वतनदार देशमुख देशपांडे ह्यांस त्यांच्या वतनावर कायम केलें; आणि कर्तृत्ववान् लोकांस लष्करी अधिकार देऊन त्यांना जहागिरी दिल्या. ह्याच्याच कारकीर्दींत हरनाकपोळ व कामराज घाटगे हे मराठे

---

१. कृतज्ञबुद्धीनें अशीं नांवें धारण केल्याचीं उदाहरणें पुष्कळ सांपडतात. इंदूरच्या सुप्रसिद्ध किबे घराण्याचे मूळ पुरुष विठ्ठल महादेव ऊर्फ तात्यासाहेब किबे हे इतिहासांत तात्या जोग ह्या नांवानें प्रसिद्ध आहेत. किबे हे कऱ्हाडे व जोग हे कोंकणस्थ. तेव्हां पुष्कळांस त्यांच्या नांवांचा घोंटाळा पडतो. परंतु महेश्वर येथील जोगांच्या पेढीवर हा प्रख्यात गृहस्थ आरंभीं होता व तेथून उदय पावला; ह्मणून त्यानें कृतज्ञबुद्धीनें जोग हें नांव धारण केलें.

मनसबदार उदयास आले. ह्मणून मराठ्यांच्या उदयाचा काल व ब्राह्मणी बादशाहीच्या सुरवातीचा काल एकच होय असें स्थूलमानानें मानण्यास कांहीं हरकत नाहीं. हसन गंगो ह्यानें सुमारें १५ वर्षें राज्य केलें. नंतर त्याच्या मागून सुमारें सतरा पुरुष गादीवर बसले. त्यांचीं नांवें व कारकीर्दी ग्रांटडफ् व मुसलमानी इतिहासकार ह्यांनीं दिल्या आहेत. ह्या सर्व बादशाहांच्या कारकीर्दींत, कमजास्त प्रमाणानें, मराठ्यांचा उत्कर्ष होऊन, त्यांची मुत्सद्देगिरी व तरवारबहाद्दरी बरीच प्रसिद्धीस आली. ब्राह्मणी राज्याची अंतर्गत व्यवस्था सुमारें एक शतकपर्यंत चांगली राहिली. नंतर ती बिघडत जाऊन प्रांतोप्रांतींचे सुभेदार प्रबल होत चालले; आणि इ. स. १५२६ सालीं, सुलतान महमूद गांगवी ब्राह्मणी याचे कारकीर्दींत, ते अगदीं स्वतंत्र होऊन, त्यांनीं अहमदनगर, गोवळकोंडें, विजापूर, बेदर व वऱ्हाड येथें नवीन पांच राज्यें संस्थापित केलीं. हीं पांचही राज्यें ब्राह्मणी राज्याच्या शाखा मानिल्या जात असून, त्यांचीं निजामशाही, कुतुबशाही, आदिलशाही, बरीदशाही व इमादशाही अशीं नांवें प्रसिद्ध आहेत. ह्यांपैकीं पहिल्या तीन शाखांशीं मराठ्यांच्या विशेष संबंध असून, त्यांनींच मराठ्यांच्या शौर्य, साहस, धैर्य, बुद्धिपराक्रम इत्यादि गुणांची जोपासना करून त्यांना योग्यतेस चढविलें; आणि त्यांना आपला भाग्योदय करून घेण्यास उत्कृष्ट संधि आणून दिली. ह्या शाखांचा काल येथें नमूद केला ह्मणजे मराठ्यांचा उदयकाल सिद्ध होईल.

| नांव. | वर्षें. | बादशाहा. |
|---|---|---|
| निजामशाही. | इ. स. १४९०—१६२६ | ११ |
| कुतुबशाही. | इ. स. १५१२—१६८३ | ७ |
| आदिलशाही. | इ. स. १४८९—१६८६ | ९ |

| | | |
|---|---|---|
| बरीदशाही. | इ. म १४९२—१६०९ | ७ |
| इमादशाही. | इ. स. १४८३—१५६८ | ४ |

ह्यांपैकीं निजामशाहीचा मूळ पुरुष स्वतःच हिंदु होता. तो पाथरीच्या बहिरंभट कुळकर्ण्यांचा मुलगा असून, त्यास सुलतान महमद गांगवी ह्यानें मुसलमान केलें, व निजामउल्मुल्क असें नांव देऊन त्यास आपल्या राज्यांत सरदारी दिली. तो पुढें फार शूर व पराक्रमी निपजून सुलतान महमद ह्याचा मुख्य प्रधान झाला. त्याचा मुलगा मलिक अहमद हाही बापाप्रमाणेंच कर्तृत्ववान् निपजून इ. स. १४८७ मध्यें अहमदनगरच्या स्वतंत्र बादशाहीचा संस्थापक झाला. निजामउल्मुल्क हा विजयनगरच्या बहिरंभट नामक ब्राह्मणाचा मुलगा असून त्याचें पूर्वीचें नांव हेमाद्रिभट असें होतें, असें एका जुन्या कागदांत लिहिलें आहे. ह्यानें आपल्या मुळच्या हिंदुत्वाचें स्मरण ठेवण्याकरितां आपल्या नांवापुढें "बहिरी" असें नांव जोडिलें. त्यावरून अहमदनगरच्या बादशाहांच्या नांवापुढें "बहिरी" हें उपपद जोडिलेलें आढळतें. ग्रांटडफ् साहेबांस "बहिरी" या पदाची बरोबर फोड न झाल्यामुळें, त्यांनीं अहमदनगरच्या बादशाहांचा मूळ पुरुष निजामउल्मुल्क हा ब्राह्मणी राज्यांत बहिरीससाण्यांवरचा अधिकारी होता, ह्मणून त्यास "बहिरी" असें नांव पडलें, अशी माहिती दिली आहे. परंतु तो पाथरीच्या कुळकर्ण्यांचा मुलगा होता याबद्दल सबळ पुरावा असल्यामुळें, या नांवाबद्दल आतां शंकाच राहिली नाहीं. ब्राह्मणी राज्याचा मूळ संस्थापक एका हिंदूचा गुलाम होता, व अहमदनगरच्या बादशाहाचा बाप मूळचाच हिंदु होता. त्याप्रमाणें विजापुरच्या आदिलशाहीचा संस्थापक युसफ आदिलशाहा ( इ. स. १४८९—इ. स. १५१० ) यानें

मराठ्यांची मुलगी आपली बायको केली होती, व तिचाच मुलगा सुलतान इस्माइल आदिलशाहा हा आपल्या बापाच्या पश्चात् विजापुरच्या गादीचा अधिपति झाला. त्याचप्रमाणें बेदरच्या बरीदशाहीचा मूळ पुरुष कासीम बरीद याचा मुलगा अमीर बरीद यानें साबाजीनामक एका मराठ्याच्या मुलीशीं आपला विवाह केला होता. यांवरून ज्या मुसलमानी अमदानींत मराठे लोक उदय पावले, तिचे मूळ संस्थापक परंपरेनें हिंदूंचे संबंधी व अभिमानी होते, हें येथें सांगणें इष्ट आहे. उत्तर हिंदुस्थानांतील धर्माभिमानी व कडव्या मुसलमानांच्या भयंकर धर्मच्छलाप्रमाणें दक्षिणेंतील मुसलमानी अमदानींत विशेष धर्मच्छल न होतां, त्यांच्या ठिकाणीं हिंदुधर्माविषयीं जी निरुपद्रवी सौम्यबुद्धि, आणि हिंदु लोकांविषयीं जो प्रेमभाव आणि जी सहानुभूति उत्पन्न झाली, त्याचें मूळ बीज कोठें आहे हें यावरून व्यक्त होईल. याच विशिष्ट गुणांमुळें मुसलमानी अमदानींत मराठ्यांस डोकें वर उचलण्यास संधि मिळाली; आणि इ. स. १३४७ मध्यें ब्राह्मणी राज्य संस्थापित झाल्यापासून इ. स १६८६ मध्यें विजापुरच्या बादशाहीची इतिश्री होईपर्यंत, सुमारें तीन साडे तीन शतकें, आपली एकसारखी प्रगति करून घेण्यास व पुढील स्वराज्यप्राप्तीचा व स्वातंत्र्यप्राप्तीचा मार्ग आक्रमण करण्यास सुलभ झालें, हें निराळें सांगावयास नकोच.

# भाग ४ था.

## मराठे सरदार.

### फलटणचे निंबाळकर.

महाराष्ट्रांतील अति प्राचीन घराण्यांपैकीं हें घराणें असून हें अस्सल रजपूत कुळांपैकीं आहे. ह्यांचें मूळचें उपनांव पवार असें असून ह्यांचा मूळ पुरुष निंबराज पवार हा उत्तर हिंदुस्थानांतील धारा नगरीमध्यें प्रसिद्ध होता. उत्तरहिंदुस्थानांत मुसलमानांच्या स्वाऱ्या होऊन यवनी अंमल संस्थापित झाल्यानंतर हे निंबराज दक्षिणेंत आले. नंतर त्यांनीं कुतुहल पर्वतानजीक अकरा वर्षेंपर्यंत अरण्यांत राहून देवीची आराधना केली. त्यांना देवी प्रसन्न होऊन "तूं व तुझे वंशज छत्रचामराधीश होतील" असा वर मिळाला. तेव्हांपासून त्यांनीं बरेंच द्रव्य मिळविलें, आणि कांहीं लोक जमवून एक गांव वसविलें. त्या गांवास हल्लीं निंबळक अशी संज्ञा आहे. निंबराजांस दृष्टांत होऊन निंबवृक्षाखालीं एक देवीची मूर्ति सांपडली. ती उकरून काढून तेथें त्यांनीं देवालय बांधिलें; व तेथें त्या मूर्तीची संस्थापना केली. त्या स्थानास हल्लीं निंबजाई असें ह्मणतात. निंबराज पवार हे इ. स. १२९१ ह्या सालीं मृत्यु पावले. ह्यांचे वंशज निंबळक गांवीं राहत असत, ह्मणून त्यांस निंबाळकर असें उपनांव प्राप्त झालें.

निंबराज ह्यांस पोदखला जगदेवराव ऊर्फ धारापतराव नामक फार पराक्रमी व शूर पुत्र होते. ह्यांनीं दक्षिणेंत कित्येक मोहिमी करून पुष्कळ लूट मिळविली. त्यांच्या रणशौर्याची कीर्ति ऐकून

महमद तघलघ बादशाहा ह्यानें त्यांस दिल्लीस नेलें; व आपल्या दरबारांत सरदारीची जागा देऊन आपल्या पदरीं ठेविलें. पुढें बादशाहाचें व दुराणी लोकांचें युद्ध झालें. त्या युद्धांत पोदखला जगदेवराव हे इ. स. १३२७ सालीं पतन पावले. धारातीर्थी पतन पावले ह्मणून ह्यांचें धारापतराव असेंही नांव प्रसिद्ध आहे. जगदेवराव मृत्यु पावल्यानंतर महमद तघलख बादशाहानें त्यांचा पुत्र निंबराज ह्यास निंबळक गांव व त्या सभोंवतालचा साडेतीन लक्षांचा मुलूख जहागीर करून दिला, व त्यास 'नाईक' असा किताब दिला. निंबराज हे आपले वडील मृत्यु पावले त्या वेळीं दिल्लीस होते. ते बादशाहानें दिलेल्या बहुमानाचा स्वीकार करून व त्याची रजा घेऊन दक्षिणेंत आले; व आपल्या नवीन जहागिरीचा उपभोग घेऊं लागले. निंबराज ह्यांनीं मूळचें निंबळक गांव हें आपलें राहण्याचें ठिकाण न करितां, बाणगंगा नदीच्या कांठीं ठाणपें ह्या नांवाचें एक खेडें होतें, तेथें नवीन गांव वसवून, ती आपली राजधानी केली. हे आपल्या वडिलांप्रमाणें देवीचे फार भक्त असून, प्रत्यहीं निंबळकास देवीच्या दर्शनास जात असत. हे इ. स. १३४९ ह्या वर्षी मृत्यु पावले.

ह्यांच्या मागून ह्यांचा पुत्र वणंगभूपाळ नाईक हा जहागिरीचा उपभोग घेऊं लागला. वणंगभूपाळ हा ब्राह्मणी राज्यांत प्रसिद्ध मनसबदार असून, दक्षिणेंतील सर्व राजकीय उलाढालींमध्यें प्रख्यात असावा असें दिसतें. ह्याजजवळ बरीच फौज असून तो कर्नाटकांत स्वाऱ्या करीत असे. एका स्वारीमध्यें फौजेनिशीं जात असतां त्याची पर्जन्यानें फार त्रेधा उडविली होती. ब्राह्मणी राज्यांतील प्रसिद्ध मनसबदार कामराज घाटगे ह्यांची मुलगी जैवंताबाई हिजबरोबर ह्याचा विवाह झाला होता.

ह्याचा इ. स. १३७४ सालीं त्याच्या हाताखालील एका शिले-दारानें कांहीं द्वेषावरून वध केला.

वणंगभूपाळ मारला गेला त्या वेळीं त्याचा पुत्र वणंगपाळ हा फार अल्पवयी होता. त्यामुळें फलटण प्रांत एका प्रबल शिले-दारानें दरोबस्त आपल्या ताब्यांत घेतला; व तोच स्वतंत्र रीतीनें जहागिरीचा कारभार पाहूं लागला. तेव्हां त्याच्या भीतीस्तव वणंगपाळ ह्याची आई जैवंताबाई आपल्या मुलासह इंदापूर प्रांतांतील लांकडी निंबोडी ह्या गांवीं गेली; व तेथें जाऊन रा-हिली. पुढें वणंगपाळ हा थोडा मोठा झाल्यानंतर, फौज जम-वून फलटण प्रांतावर चालून आला, आणि त्यानें त्या पुंड शिले-दाराचा मोड करून स्वतःची जहागीर त्यापासून परत घेतली. हा स्वतः फार शूर योद्धा असून, त्यानें सातपुड्यापर्यंत स्वाऱ्या करून भिल्ल लोकांच्या टोळ्या फोडल्या, अशी ख्याति आहे. ह्याच्याच कारकीर्दींत इ. स. १३९६ ह्या वर्षीं सर्व हिंदुस्थान-भर दुर्गादेवीचा दुष्काळ पडला; व लाखों लोकांची प्राणहानि होऊन देश ओसाड झाला. ह्या दुष्काळांत इ. स. १४०० सालीं ह्याचा अंत झाला. ह्याच्या मागून वणंगोजीराव (१४००-१४२०), पहिले मालोजीराव (१४२०-१४३५), पहिले बाजीसाहेब (१४३५-१४६५), पोवारराव नाईक (१४६५-१४८०), दुसरे बाजीसाहेब असे पांच पुरुष निंबाळकरांच्या गादीचे अधिपति होऊन गेले. परंतु त्यांच्या नामोल्लेखापेक्षां अधिक माहिती मिळत नाहीं. ह्यावरून, दुर्गादेवीच्या दुष्काळानें महाराष्ट्रांत झालेली भयंकर हानि व कुटुंब-ऱ्हास पुढें बरेच दिवस भरून निघाला नसावा, व त्यामुळेंच मध्यंतरींच्या इति-हासाचा लोप झाला असावा, असें अनुमान होतें. असो.

इ. स. १४८९ ह्या वर्षीं अबुल मुझफर युसफ ह्यानें वि-

जापूर येथें स्वतंत्र राज्य संस्थापित केलें. तदनंतर पुनः फल-टण जहागिरीचा उदय झाला असें दिसतें. युसफ आदिल-शाहानें फलटणचे प्राचीन मराठे जहागिरदार बाजीसाहेब नाईक ह्यांस अनुकूळ करून घेऊन, त्यांस महमद तघलघाच्या सनदे-प्रमाणें फलटण जहागिरीची दुमाल्यासह दुसरी नवीन सनद करून दिली. ही सनद घेण्याकरितां, इ. स. १४९० सालीं, बाजी-साहेब नाईक हे विजापुरास गेले होते, अशी माहिती मिळते. ह्यावरून प्राचीन मराठे घराण्यांस संतुष्ट करून, त्यांच्या साह्या-य्यानें स्वराज्याचा अंमल नवीन प्रांतांमध्यें बसविण्याची युसफ आदिलशाहाची मसलत चांगली निदर्शनास येते. असो. बाजी-नाईक हे इ. स. १५१२ मध्यें मृत्यु पावले. त्यांचे मागून त्यांचे पुत्र मुधोजी नाईक हे संस्थानचे अधिकारी झाले. हे फलटण जहागिरीचा उपभोग घेत असतांना, किल्ले ताथवडा ऊर्फ संतोषगड येथें काजीपणाचे मानपानाबद्दल तंटा उपस्थित झाला. त्याचा निकाल करण्यास गेले असतां मुधोजी नाईक ह्यांचा किल्ल्यामध्येंच कोणी बदमाष माणसानें वध केला. ही गोष्ट इ. स. १५२७ मध्यें घडली. ह्यांच्या मागून बाजी धारराव (१५२७-१५६०) व दुसरे मालोजीराव (१५६०-१५७०) असे दोन पुरुष फलटणचे सत्ताधिकारी होऊन गेले. ह्यांपैकीं दुसरे मालोजीराव हे इतिहासप्रसिद्ध वणंगोजी ऊर्फ जगपाळराव निंबा-ळकर व दीपाबाई ह्यांचे वडील होत.

जगपाळराव हे आपले वडील निवर्तल्यानंतर इ. स. १५७० सालीं फलटणचे अधिकारी झाले. हे वणंगपाळ ह्या नांवा-नेंही प्रसिद्ध आहेत. हे फार कर्तृत्ववान् व पराक्रमी निपज-ल्यामुळें ह्यांची मुसलमानी दरबारांत विशेष चाहा झाली होती. ह्यांचें इतकें प्रस्थ वाढलें होतें कीं, सर्व वजीर लोक ह्यांस वचकून

राहत असत. ह्यांच्या शौर्यप्रभावामुळें "राव वणंगपाळ, बारा वजीरांचा काळ" अशी ह्मण पडली होती. ह्यांच्याच आश्रयानें मालोजी व विठोजी भोंसले हे प्रथम नांवारूपास आले. फलटण प्रांताजवळ शिखर शिंगणापुर नामक महादेवाचें जें पुरातन देवस्थान आहे, तेथें मालोजी राजे व विठोजी राजे हे आपल्या मातुश्रीसहवर्तमान राहत होते. शिंगणापुर येथें मालोजी राजे ह्यांनीं बांधलेलें देवालय व तलाव अद्यापि प्रसिद्ध असून तेथें त्यांची छत्रीही आहे. शंभु महादेवावर मालोजीची फार भक्ति असल्यामुळें, त्यांस श्री प्रसन्न होऊन कांहीं दृष्टांत झाला; ह्मणून ते फलटणास येऊन जगपाळरावांस भेटले. जगपाळराव हे त्या वेळीं आदिलशाही-अमलांतील मुलूख मारून पुंडावा करीत असत. त्यांच्या जवळ सैन्यभार पुष्कळ असून ते फार बलाढ्य व धनाढ्य झाले होते. त्यांची भेट घेऊन, मालोजी व विठोजी हे, त्यांच्या पदरीं बाराशें होनांची तैनात मान्य करून, इ. स. १५७७ सालीं नौकरीस राहिले. ह्या उभयबंधूंच्या अंगचे शौर्य-साहसादि उत्तम गुण जगपाळरावांच्या दृष्टीस पडतांच ते त्यांच्यावर फार खुष झाले; व त्यांनीं आपली बहीण दीपाबाई मालोजी राजांस देऊन त्यांचें लग्न केलें. मालोजी राजे व विठोजी राजे ह्यांनीं जगपाळरावांच्या कोल्हापुरावरील स्वारीमध्यें

१ ह्या त्यांच्या पराक्रमाचें वर्णन शंभु महादेवाच्या एका जुन्या बखरीमध्यें पुढें लिहिल्याप्रमाणें दिलें आहे:—"निंबाळकर वणंगपाळ कोल्हापुर प्रांतें स्वारीस बारा सहस्र स्वारांसमवेत निघता झाला. तों रंकाळें तळें याच्या समीप डेरे देऊन राहता जाहला. तों तळ्याचें उदक उत्तम पाहून निंबाळकर वणंगपाळास इच्छा झाली जे, जळक्रीडा करावी. ह्मणोन उदकांत कनाती देऊन वेदयांसहवर्तमान जळक्रीडा करावयास लागला. संपूर्ण लोक आपआपले अश्व धोवयास लागले. हेहि उभयतां बंधू (मा-

विशेष पराक्रम दाखविला. ह्मणून त्यांची अहमदनगरच्या बाद-शाहींत कीर्ति जाऊन तिकडच्या दरबारामध्यें त्यांचा प्रवेश झाला व इ. स. १६०४ सालीं त्यांस जहागीर मिळाली. असो.

---

लोजी व विठोजी ) आपले अश्व प्रक्षाळून, सेवकाचे हातीं देऊन, उष्णांत उदकाबाहेर उभे करून, आपण स्नान करिताती. तों ते समयीं भगवंतें कौतुक अपूर्व दाखविलें. विजापुरच्या यवनानें बारा सहस्र घोडा रवाना केला. ( वणंगपाळ ) हा पुंडाई करून तमाम पातशाही मुलूख खराब करितो; असावध पाहून जीतच धरून आणावा; ह्मणोन अकस्मात् युद्धा-कारणें सिद्ध होऊन चाली केली. तों दोहीं हत्तींवरी दोन निशाणे मोकळीं सोडून नगारे वाजवीत आले. तों एकत्र प्रळय झाला. संपूर्ण सैन्य गजबजिलें. तितक्यामध्यें ह्या उभय बंधूंनीं "हरहर महादेव" ऐसा शब्द करून, उपलाणींच अश्वांवरी स्वार होऊन, दोघांनीं दोन फिरंगा हातीं घेऊन, आणि दोन भाले अडासनीं घालोन, सन्मुख होऊन समरां-गणीं मिसळते झाले. तो दोन्ही हत्ती मदोन्मत्त नीट दोघां बंधूंवरही महा-तांनीं चालविले. तों भोळा चक्रवर्ति शंभू उभयतां बंधूंच्या हृदयकमळीं प्रवेश करून ख्याति करविली. उभयतां बंधूंनीं परस्परें विचार केला कीं, आजि शतवर्षें आपलीं पूर्ण झालीं. आतां माघारें मुख लोकांस काय दा-खवावें ? ह्मणोन हातांत भाले घेऊन, फिरंगा मांडीखालीं ठेवून, नीट हत्तीसन्मुख होऊन, गंडस्थळें लक्षून मारिते झाले. तों श्रीशंभूच्या प्रतापें-करून हत्ती गर्जना करून माघारे फिरते झाले. सवेंच सैन्यही संपूर्ण मागून येतें झालें. परम घोर युद्ध परस्परें होतें झालें. त्या युद्धांत हे उभयतां बंधु हातांत फिरंगा घेऊन, जैसे कांहीं ईश्वराचें सुदर्शन फिरतें त्या न्यायेंकरून फिरते झाले. त्या यवनांचा पराभव करून सात शत अश्व सोडवून आणिले. आणि कित्येक योद्धे संहार करून, आपल्या सैन्यासहवर्तमान डंका वाजवीत यशस्वी होऊन, शिबिरास येऊन उत-रते झाले. मग समस्त शूर सैन्यांत होते त्यांस दोघे अवगमले जे, हे परम योद्धे, झुंझार, सामर्थ्यवंत, प्रतापी. धन्य यांचीं मातापितरें, ज्यांच्या उदरीं ऐसीं रत्नें निर्माण झालीं. ऐसी स्तुति परस्परें करों लागले. ते कीर्ति

जगपाळराव नाईक निंबाळकर ह्यांस मालोजी राजे ह्यांच्या विषयीं फार अभिमान व अगत्य असल्यामुळें त्यांनीं त्यांस वेळोवेळीं उत्कृष्ट साहाय्य करून त्यांस ऊर्जित दशेस आणिलें. दौलताबादचे प्रख्यात मनसबदार लुकजी जाधवराव ह्यांची कन्या जिजाबाई हिच्याशीं शहाजीचा विवाह करण्याचा मालोजीचा पण सिद्धीस नेण्यास, जगपाळराव हेच मुख्यतः कारण झाले, असा ग्रांटडफ् साहेबांनीं उल्लेख केला आहे. ह्यावरून जगपाळराव निंबाळकर ह्यास मराठ्यांच्या इतिहासांत उच्चस्थान देणें अत्यंत अवश्य आहे. त्यांचें समग्र चरित्र फार महत्त्वाचें असून तें उपलब्ध झालें तर भोंसल्यांचा प्रारंभींचा खरा इतिहास व्यक्त होईल, व मराठेशाहीच्या भव्य इमारतीचा पाया कसा रचला गेला त्याचें सत्यस्वरूप दृग्गोचर होईल. जगपाळराव हे खरे लढवय्ये असून त्यांना युद्धाचा व शिकारीचा पराकाष्ठेचा नाद असे. त्यामुळें सदैव त्यांची समशेर सज्ज असे; व त्यांचा देहही अखेर समरांगणांतच पतन पावला. फलटण संस्थानच्या दप्तरांत, हे विक्रमशाली पुरुष इ. स. १६६० मध्यें दिल्लीपति शहाजहान व विजापुरचा बादशाहा ह्यांच्या सैन्याचें जें तुमुल युद्ध झालें त्यांत पतन पावले, अशी माहिती मिळते. परंतु

---

चहूंकडे प्रगट झाली." ह्या हकीकतींतील अतिशयोक्तीचा कांहीं भाग असल्यास तो वजा केला तरी, कोल्हापुरच्या स्वारीमध्यें मालोजी व विठोजी ह्यांनीं आपलें विशेष शौर्य गाजविलें हें सिद्ध होतें. फलटण संस्थानच्या हकीकतींत कोल्हापुरच्या स्वारीचा उल्लेख आहे; परंतु ग्रांटडफ किंवा मुसलमानी इतिहासकार त्याबद्दल कांहींच उल्लेख करीत नाहींत. प्रसिद्ध झालेल्या मराठी बखरीही ह्या बाबतींत स्तब्ध आहेत. ह्यावरून सोळाव्या शतकांतील मराठ्यांचा इतिहास अगदीं अनुपलब्ध आहे असेंच ह्मणावें लागतें !

ग्रांटडफ् साहेबांनीं, फलटणच्या जानराव नाईकांच्या माहिती-वरून, हे इ. स. १६२० सालीं मलिकंबरच्या व विजापुर-करांच्या रणसंग्रामांत मृत्यु पावले, असा उल्लेख केला आहे.

जगपाळराव निंबाळकर मृत्यु पावल्यानंतर, त्यांच्या मागून मुधोजीनाईक निंबाळकर हे फलटणचे अधिपति झाले. ह्यांस प्रारंभीं विजापुरच्या मुलुखांत लूट केल्याच्या आरोपावरून कांहीं दिवस सातारच्या किल्ल्यावर कैदेंत ठेविलें होतें. पुढें हे पहिला इब्राहिम आदिलशाहा ह्यास शरण गेले, त्यामुळें त्यांस इ. स. १६४० मध्यें फलटणची सरदेशमुखी व 'नाईक' हा वडिलार्जित किताब पुनः प्राप्त झाला. ह्यांस साबाजीराव, जगदेवराव व बजाजीराव असे तीन पुत्र व सईबाई नामक एक कन्या होती. ह्यांचे दोन पुत्र साबाजीराव व जगदेवराव ह्यांनीं विजापुरकरांच्या पदरीं राहून मोठमोठ्या मनसबदाऱ्या उपभोगिल्या; व दरबारांत मोठा लौकिक संपादन केला. इब्राहिम आदिलशाहा ह्यानें मोंगल लोकांचें वर्चस्व कमी करण्याकरितां मराठे सरदारांस फार उच्चप्रतीचे अधिकार देण्याचा व मराठ्यांचें सैन्य अधिक ठेवण्याचा क्रम सुरू केला होता. तेव्हांपासून मराठ्यांचा भरणा विजापूरदरबारीं विशेष झाला. घाटगे, माने, घोरपडे, निंबाळकर, वगैरे सरदार त्या दरबारचे केवळ आधारस्तंभच बनले; व सर्व राजकारणें त्यांच्या तंत्रानें चालूं लागलीं. निंबाळकर हे भोसल्यांचे पूर्वसंबंधी व दरबारचे मनसबदार असें समजून, शहाजी राजे ह्यांनीं त्यांची मुलगी सईबाई इजबरोबर शिवाजी महाराजांचें लग्न केलें. येणेंप्रमाणें पुनः भोसल्यांचा व निंबाळकरांचा शरीरसंबंध जडला. हें लग्न मुधोजीराव हयात असतांनाच झालें असें दिसतें. मुधोजीराव ह्यांचे दोन चिरंजीव वि-

जापूरदरबारीं नौकर होते. परंतु ते स्वतः विजापुरच्या अमलांत पुंडावे करीत होते. त्यांच्या पारिपत्यार्थ विजापुराहून जें सैन्य आलें, त्यांत खुद्द त्यांचे हे दोन पुत्र होते. त्यांचें व मुधोजीराव ह्यांचें युद्ध झालें. त्यांत त्यांस बंदुकीची गोळी लागून ते इ. स. १६४४ सालीं मृत्यु पावले. ज्या ठिकाणीं त्यांचा अंत झाला त्या ठिकाणास 'नाईक बोंब' असें नांव पडलें आहे.

मुधोजीराव मृत्यु पावल्यानंतर, त्यांचे वडील पुत्र साबाजीराव व जगदेवराव ह्यांची हकीकत काय झाली, हें समजत नाहीं. त्यांचे तिसरे चिरंजीव बजाजीराव ह्यांजवर आपल्या पित्याचा वध केला असा आरोप ठेऊन, मुसलमान सरदारांनीं त्यांस विजापुरास पकडून नेलें; व फलटणची जहागीर जप्त केली. विजापूर येथें गेल्यानंतर, बजाजीराव ह्यांची चौकशी न होतां, बादशाहानें त्यांस बंडखोर सरदाराचे पुत्र समजून, देहान्त शिक्षा देण्याचा हुकूम केला. हे कुलीन व थोर सरदार असल्यामुळें, त्यांच्या त्रतीनें विजापुर दरबारांतील मोठमोठ्या अमीरउमरावांनीं बादशाहाकडे मध्यस्ती करून, त्यांची ही शिक्षा रहित केली. परंतु बादशाहानें दरबारांत बोलावून आणून त्यांस विचारिलें कीं, "जर तुह्मी मुसलमानी धर्म स्वीकाराल, तर तुह्मांस जीवंत सोडून तुमची जहागीर मोकळी करून देऊं." बजाजीराव ह्यांनीं उत्तर दिलें कीं, "जर तुह्मी आपल्या मुलीचें लग्न मजबरोबर करीत असाल, तर मी मुसलमानी धर्म स्वीकारितों." हें बाणेदार उत्तर ऐकून बादशाहास थोडा राग आला. परंतु त्यानें ह्या प्रबल मराठे सरदारास विजापुरच्या गादीचा पक्का दोस्त बनविण्याकरितां मुसलमान करून, आपली मुलगी त्यास देण्याचें मान्य केलें; व तिचें त्याजबरोबर मोठ्या थाटानें लग्न करून दिलें. बजाजीराव हे स्वरूपानें फार देखणे व सुंदर होते.

त्यामुळें शहाजादीचेंही त्यांच्यावर फार प्रेम बसलें होतें. ते विजापूर दरबारीं ४।५ वर्षें राहिले होते. त्यामुळें बादशाहाची त्यांजवर सुप्रसन्न मर्जी होऊन त्यानें त्यांस फलटणची जहागीर पुनः बक्षीस दिली. नंतर ते बादशाही सनद घेऊन स्वतःच्या जहागिरीचा उपभोग घेण्याकरितां फलटणास आले. त्यांची पत्नी शहाजादी ही त्यांच्या पश्चात् विजापुरांतच होती. ती कांहीं कालानें मृत्यु पावली.

बजाजीराव फलटण देशीं आल्यानंतर, त्यांच्यासारखा शूर सरदार स्वधर्मच्युत झालेला पाहून, अखिल महाराष्ट्राभिमानी लोकांस वाईट वाटलें असावें, व बजाजीराव ह्यांसही 'स्वधर्मे निधनं श्रेयः' ह्या भगवदुक्तीप्रमाणें स्वधर्माचा महिमा चांगला व्यक्त होऊन पुनः त्याचें अवलंबन करण्याची इच्छा झाली असावी, असें दिसतें. अर्थात् बजाजीराव ह्यांस स्वधर्मांत येण्याची इच्छा होतांच शिवछत्रपति व त्यांच्या मातुश्री जिजाबाई ह्यांनीं, ह्या शूर सरदारांस जातींत घेणें हेंच राजकीय व सामाजिक दृष्ट्या योग्य आहे असें ठरविलें, आणि त्यांस शिंगणापूर महादेवीं नेऊन शुद्ध करून जातींत घेतलें! ह्यावरून शिवाजी महाराजांच्या महाराष्ट्रधर्माचीं तत्त्वें किती उदात्त होतीं, हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

बजाजीराव यांनीं शुद्ध झाल्यानंतर आपलीं दोन लग्नें केलीं; व मराठे सरदारांनीं त्यांस मुली दिल्या. ह्या स्त्रियांपासून त्यांस गोरखोजी, महादाजी, वणंगोजी व मुधोजी असे चार पुत्र झाले. पुढें हे मुसलमान झालेले सरदार जातींत घेतले म्हणून त्यांच्या कुलास क्षुद्र दृष्टीनें लेखणारी कांहीं मंडळी निपजली. तेव्हां त्यांचें समाधान करण्याकरितां, खुद्द शिवाजी महाराजांनीं आपली कन्या सकूबाई हिचा विवाह बजाजीरावांचे दुसरे पुत्र महादाजी

नाईक निंबाळकर ह्यांजबरोबर करून दिला, आणि स्वतःच्या वर्तनानें आपलें प्रशंसनीय औदार्य सर्वश्रुत करून लोकांस विलक्षण कित्ता घालून दिला. अशा पुण्यश्लोक उदार नृपतीची सत्कीर्ति सर्व जगभर यावच्चंद्रदिवाकरौ दुमदुमत रहावी, ह्यांत आश्चर्य तें काय?

बजाजीराव ह्यांनीं शिवनृपतीचे उपकार स्मरून त्यांस नाजूक राजकारणांत अप्रतिम साहाय्य केलें. ह्मणून शिवाजी महाराजांनीं त्यांचें अभिनंदन करून, त्यांस वाल्हें गांव इनाम करून दिलें. बजाजीराव इ. स. १६७६ सालीं मृत्यु पावले. ह्यांचें फलटण येथें नाईक वंशाच्या स्मशानभूमीच्या आवाराबाहेर घुमटाच्या आकाराचें एक थडगें प्रसिद्ध आहे. ह्यास 'लांडे बजाजी यांचें घुमट' असें नांव अद्यापि प्रचलित आहे. लांडे हा शब्द मुसलमानवाचक आहे, हें निराळें सांगावयास नकोच.

बजाजीराव नाईक मृत्यु पावल्यानंतर त्यांचे पुत्र वणंगोजी हे गादीचे अधिपति झाले. महादाजी हे शिवाजी महाराजांचे स्वारींत स्वसैन्यानिशीं हजर असत. त्यांनीं शिवाजी महाराजांस महाराष्ट्रराज्यसंस्थापनेच्या कामीं उत्कृष्ट साहाय्य केलें. शिवाजी महाराज समाप्त झाल्यानंतर पुढें संभाजी महाराजांची कारकीर्द सुरू झाली. त्या कारकीर्दींत औरंगजेबानें सर्व महाराष्ट्रप्रांत काबीज करून संभाजीचा वध केला; व मराठ्यांचे प्रमुख सरदार पाडाव करण्याचा प्रयत्न केला. त्यांत महादाजी नाईक निंबाळकर हे त्यास सांपडले. त्यांस शिवाजीचे जामात समजून त्यानें ग्वाल्हेरच्या किल्ल्यावर कैदेंत ठेविलें. तेथेंच ते मृत्यु पावले व त्यांची पत्नी त्यांजबरोबर सती गेली. त्यांस औरस संतति कांहीं नव्हती; परंतु एक दासीपुत्र होता. त्यास शाहु महाराजांनीं पांच हजार स्वारांची मनसब करून दिली होती. परंतु पुढें बाळाजी

बाजीराव पेशव्यांचें व त्यांचें वैमनस्य आल्यामुळें तो निजामाकडे गेला. हैद्राबादेकडे 'रावरंभा' ह्या नांवानें त्याचें घराणें अद्यापि प्रसिद्ध आहे.

औरंगजेबानें संभाजीचा वध केल्यानंतर पुढें मराठ्यांनीं चंदीस जाऊन जें राजकारण केलें, त्या वेळीं कांहीं निंबाळकर मंडळी मोंगलांकडे नौकरीस होती, तीही मराठ्यांस येऊन मिळाली; व त्यांनीं राजाराम महाराजांस चांगली मदत केली. ह्यामध्यें अमृतराव बिन तुकोजीराव निंबाळकर ह्यांचें नांव विशेष ऐकूं येतें. ह्यांनीं महाराष्ट्रधर्म रहावा ह्मणून स्वामींच्या पायाशीं चंदी मुक्कामीं व देशांत एकनिष्ठभावें सेवा केली; ह्मणून राजाराममहाराजांनीं त्यांचें अभिनंदन केलें होतें. ह्या पुरुषाचे वंशज सोलापूर जिल्ह्यांत दहीगांवीं अद्यापि आहेत, असें समजतें.

इ. स. १६९३ सालीं वणंगोजी नाईक वारल्यापासून फलटणची जहागीर अद्यापि चालत आहे. सांप्रतचे जहागीरदार श्रीमंत मुधोजीराव नाईक निंबाळकर हे आहेत. ह्यांच्या विषयीं व ह्यांच्या घराण्याविषयीं महाराष्ट्रांत फार पूज्यभाव आहे.

## घाटगे मलवडीकर.

हें महाराष्ट्रांतील सूर्यवंशी क्षत्रिय घराणें ब्राह्मणी राज्यामध्यें उदय पावलें. ह्याचा मूळ पुरुष कामराज घाटगे हा होय. हा सोळा वर्षांचा असतांनाच ह्याचा, ब्राह्मणी बादशाहा हसनगंगू ह्याच्या दरबारांत प्रवेश होऊन, ह्यास कांहीं स्वारांची मनसब मिळाली. बादशाहानें ह्याचा पराक्रम पाहून ह्याची फार तारीफ केली; आणि ह्यास हणंगनाक पोळ या नांवाच्या एक मातबर मनसबदाराची कन्या करून दिली. ग्रांटडफ् साहेबांनीं हरनाक पोळ व कामराज घाटगे ह्यांस दोन तीनशें स्वारांच्या मनसबी

होत्या ह्मणून उल्लेख केला आहे. त्यावरून तो हरनाक पोळ आणि हा हणंगनाक पोळ एकच माणूस असावा असें दिसतें. कामराज घाटगे ह्यास मलवडी व ललगुण ह्या दोन महालांची देशगत होती. ह्या देशगतीवर नारायण हरी ह्मणून एक देशकुळकर्णी होता. त्याजवर कामराज ह्याचा फार भरंवसा असल्यामुळें त्यास त्यानें आपल्या वतनाची व्यवस्था करण्याकरितां मुतालिक नेमिलें; आणि आपण बेदरास राहून बादशाहाची चाकरी करूं लागला. त्याच्या सर्व दौलतीचा तोच कारभार करीत असे. काळे रामेश्वरभटजी ह्मणून एक महा ईश्वरभक्त व साधुपुरुष कामराज घाटगे ह्यांचे पुरोहित होते. त्यांचा जांवई नारायण हरी हा होता, अशीही माहिती मिळते. हे सत्पुरुष कामराजाचें यश चिंतन करून सदैव त्याच्या स्वारीबरोबर असत. ह्यांनींच कामराजाचा प्रतिपाळ करून त्यास नांवारूपास आणिलें; व आपल्या मंत्रसामर्थ्येंकरून बादशाही दरबारांत त्याची योग्यता वाढवून, त्यास मनसबदारी प्राप्त करून दिली. काळे रामेश्वरभटजी ह्यांचे वडील महासिद्ध पुरुष असून त्यांचें मंत्रसामर्थ्य लोकोत्तर होतें. त्यांनीं "अमावास्येची पौर्णिमा केली व दुर्गें भांडत होतीं तीं मंत्रविद्येकरून घेऊन दिलीं" असें एका जुन्या बखरींत वर्णन केलेलें आहे. अर्थात् अशा योगी पुरुषाचा पुत्र योग्यच निघावा हें साहजिक आहे. हे काळे रामेश्वरभटजी आपल्या गंधाक्षतांच्या योगानें व चंबूंतील तीर्थसिंचनानें कामराजाचीं सर्व संकटें दूर करीत असत. ह्मणून कामराजानें गंधाक्षतांचें निशाण व चंबूचा शिक्का केला होता. तो त्या घराण्यांत शेवटपर्यंत चालत होता. ह्यावरून महापुरुषाचें वरप्रदान घेण्याची चाल हिंदु क्षत्रियांमध्यें फार प्राचीन काळापासूनची आहे, असें दिसून येतें. कामराज घाटगे अनेक

पराक्रम करून इ. स. १४३९ सालीं वारले, असा उल्लेख सांपडतो. ह्यावरून त्यांचें बरेंच वय असावें असें दिसतें.

महाराष्ट्रामध्यें दुर्गादेवीचा भयंकर दुष्काळ इ. स. १३९६ सालीं पडला. त्या वेळीं वतनदार वगैरे रयत व दिवाणचे ह्मणजे सरकारचे अधिकारी वगैरे सर्व लोक, वाट फुटेल तिकडे निघून गेले. हा दुष्काळ पडण्यापूर्वी, शके १३१८ धातानाम संवत्सरे कार्तिक शुद्ध पौर्णिमा शुक्रवार ह्या दिवशीं, काळे रामेश्वरभटजींस दुर्गादेवीचा दृष्टांत होऊन, शाहणे असतील त्यांनीं विद्यानगराकडे जावें अशी अनुज्ञा मिळाली. त्याप्रमाणें उपमन्यु, भारद्वाज, मालंजन, कौशिक आणि भृगु ह्या गोत्रांचे लोक दक्षिणप्रांतीं विद्यानगराकडे गेले, असा उल्लेख सांपडतो. ह्यावरून रामेश्वर-भटजी विद्यानगराकडे गेले असावेत असें दिसतें. ह्यापुढें ह्या पुरुषाची माहिती मिळत नाहीं. दुर्गादेवीचा दुष्काळ संपल्या-नंतर, सुलतान अहमदशाहा वली बहामिनी ह्याच्या कारकी-र्दींत, इ. स. १४२९ सालीं, महाराष्ट्रांतील बंडखोर लोकांचें पा-रिपत्य करण्याकरितां, व पूर्वीच्या लोकांची वसाहत करून देण्याकरितां, मलिक-उल्-तिजार नामक एक बादशाही सरदार खटाव प्रांतामध्यें सैन्य घेऊन आला होता. त्याच्या बरोबर दादू नरसू काळे ह्मणून एक ब्राह्मण मुत्सद्दी होता. त्याचा ग्रांटडफ्च्या इतिहासांत उल्लेख आहे. तो ह्या काळे रामेश्वर-भटजींचा नातू होय. त्याचें शुद्ध नांव दादाजी नरसिंह असें आहे. काळे रामेश्वरभटजी अथर्ववेदी असल्यामुळें त्यांचें उपनांव 'अथर्वण' असें बखरीमध्यें दिलें आहे. परंतु ग्रांटडफ् साहेबांनीं रामेश्वरभटजींच्या मागचें काळे विशेषण त्यांच्या नातवापुढें जोडून, त्यांचें उपनांव काळे ह्मणून तयार केलें आहे. रामेश्वर-भटजींचा कृष्णवर्ण असावा ह्मणून त्यांस काळे हें वर्णवाचक

विशेषण मिळालें असावें. घाटग्यांचे पुरोहित काळे ह्या नांवाचे कोणीही नाहींत. तेव्हां दादू नरसूचें काळे हें उपनांव चुकीचें आहे हें उघड आहे. असो. दुर्गादेवीच्या दुष्काळामध्यें सर्व महाराष्ट्रदेश उध्वस्त होऊन गेला, व ३० वर्षांमध्यें तेथील सर्व लोकवस्ती नाहींशी झाली. नंतर पुढें ज्या वेळीं पर्जन्य पडला, त्या वेळीं बेरड रामोशी वगैरे लोक ह्या प्रांतांत येऊन लूटमार करून राहूं लागले. त्यांच्या मुळें लोकांस मनस्वी ताप झाला. खटाव येथें भूपतराव बेरड फार पुंड माजला होता. त्यानें तेथें कोट बांधून सैन्य जमविलें होतें. मौजे भांडवली कसबे मलवडी येथें महिपतराव बेरड ह्मणून दुसरा पुंड होता. ह्या दोघांनीं प्रळय करून सोडला. तेव्हां त्यांचा बंदोबस्त करण्याकरितां कामराज घाटगे ह्यांनीं बादशाहाची विनंति करून, मलिक-उल्-तिजार ह्या सरदाराच्या हाताखालीं कांहीं सैन्य पाठविलें होतें. त्याबरोबर त्यांनीं आपला कारकून दादाजी नरसिंह ह्यास दिलें होतें. हे प्रथम कृष्णातीरानें कऱ्हाडास आले व तेथून माणदेशांत गेले. त्यांचें व बेरडांचें दोन महिने झुंज चाललें. अखेर कांहीं किल्ले व प्रांत सर करून, मलिक-उल्-तिजार हा, बेरडांशीं सख्य करून व त्यास वाघीनगिरा, पाल, चित्रदुर्ग वगैरे गांवीं जागा देऊन बेदरास गेला. तेव्हां महमदशाहा बादशाहानें सर्व खटाव देश, दादाजी नरसिंह व दुसरा एक खोजा ह्यांच्या ताब्यांत देऊन, त्याची लावणी संचणी करण्याचें काम त्यांजकडे सोंपविलें. ह्या उभयतांनीं ठायीं ठायीं, एक पांढरीच्या चार चार पांढऱ्या करून, गांवांचीं नांवें ठेविलीं; व लोकांस वसाहत करण्यास सर्व प्रकारच्या सवलती दिल्या. त्यांनीं पहिल्या वर्षी जमिनीचा वसूल न घेतां पुढें दर बिघ्यास एक तोब्राभर धान्य घेण्याचा ठराव केला. "दादो नरसिंही तोब्रा" ह्मणून ह्या वसु-

ल्याचें नांव अद्यापि प्रसिद्ध आहे. ह्यावरून मुसलमानी अमदानींत दुष्काळ संपल्यानंतर शेतसारा किती अल्प घेत असत, हें लक्षांत घेण्यासारखें आहे. दादाजी नरसिंह ह्यानें खटाव, ललगुण व मलवडी येथील देशकुळकरण नारायण हरी ह्यांस दिलें व कामराज घाडगे ह्यांच्या देशगतीची उत्तम व्यवस्था केली. शके १३४९ प्लवंगनामसंवत्सरापासून मुलूख भरूं लागला, व शके १३६१ पर्यंत ह्मणजे कामराजाच्या मृत्यूपर्यंत चांगली लोकवस्ती झाली. कामराजाच्या मृत्यूनंतर दादाजी नरसिंहाची माहिती सांपडत नाहीं.

कामराज ब्राह्मणी राज्यांत चांगला लौकिक मिळवून मृत्यु पावल्यानंतर, त्याचें वतन व जहागीर त्याचे मुलगे करूं लागले. कामराजास, परसनाक, लोहनाक, नयनाक, जैतपाळनाक, बगडनाक आणि लोकनाक असे सहा मुलगे होते. त्यांचा वंशविस्तार बहुत झाला. घाटगेमंडळ ह्मणून जेवढें आहे, तेवढें ह्या सहा पुरुषांचे वंशज होत. कामराजाच्या मागें परसनाक व जैतपाळनाक ह्यांनीं कसबे मलवडी व ललगुण वगैरे ठिकाणची देशगत केली. पुढें त्यांचे वंशज पराक्रमी निपजून ते देशगत करूं लागले, व कांहीं निजामशाही व आदिलशाहीमध्यें जाऊन लौकिकवान् निपजले. कामराजाच्या मृत्यूपासून पुढें सुमारें शेंदीडशें वर्षांचा संगतवार इतिहास सांपडत नाहीं. त्यांतील कांहीं पुरुष ब्राह्मणी राज्यामध्यें व कांहीं देशांत्तर राहून, वतनें व बादशाही चाकऱ्या करीत होते. वंशविस्तार अधिक झाल्यामुळें त्यांच्यामध्यें देशगतीसंबंधानें एकसारखे तंटे चालत असत. त्या वेळीं खटाव प्रांतावर एक मुसलमान सुभेदार बादशाहाच्या वतीनें असे. त्याच्याशीं भांडण्याझगडण्यांत, देशावर पुंडाई करण्यांत आणि मुसलमानी अंमलास खलेल करण्यांत कांहीं

घाटगमंडळी तरबेज असे. कांहीं घाटगे मुसलमानी दरबा-रांत प्रवेश करून, खावंदांची मर्जी संपादन करण्यांत व बादशाही मानमरातब व इतमाम मिळविण्यांत गुंतलेली असे. ह्या सर्वांची माहिती अद्यापि चांगलीशी उपलब्ध झालेली नाहीं.

कामराजाच्या सहा पुत्रांची जी माहिती थोडीबहुत उपलब्ध झाली आहे, तीवरून परसनाकाचा व जैतपाळाचा वंश देशगत करून, खटाव, मलवडी व बुध ह्या भागांतच होता असें दिसतें. बगडनाकाचा वंश दिकसळ वगैरेकडे गेला. लोकनाकाचा वंश कागलास गेला व तेथील देशगत करूं लागला. आणि लोह-नाकाचा वंश विशेषेंकरून मुसलमानी अमदानीमध्यें उत्कर्ष पा-वून फार प्रसिद्ध झाला. ह्याच वंशाचा मराठी राज्याशीं विशेष संबंध आहे. ह्मणून ह्याचीच हकीकत संक्षेपेंकरून येथें दाखल करितों.

लोहनाक ह्याचा पुत्र कडतोजी ह्मणून होता. त्याचा पुत्र चायाजी व त्याचा पुत्र बाळोजी. हे पराक्रमी निपजल्यामुळें त्यांस 'बाजी' अशी किताबत मिळाली. बाळोजी निजामशाही दरबा-रामध्यें प्रसिद्धीस आल्यामुळें, त्यास मालोजीचा मेहुणा वणंगोजी निंबाळकर ह्यानें आपली कन्या जानाई ही दिली होती. ह्यांची निजामशाहीमध्यें मनसब असून वणंगोजी निंबाळकर ह्याची त्यावर फार मेहेरबानी होती. हा बाळोजी पुढें विजापूर दरबारीं गेला व तेथें फार उत्कर्ष पावला. त्यामुळें तेथील अमीरउमरावांस त्याचें वर्चस्व सहन होईनासें झालें. त्यामुळें बादशाहींतील वजीर याकूद सर्जा ह्यानें त्यास विश्वास दाखवून, एका मेजवा-नीमध्यें ठार मारिलें. ह्यास कोरपाळजी, बाबजी, झलोजी, लखोजी, (कह्याजी) कडतोजी, राहुजी, मिटोजी, असे सात पुत्र होते. ह्यांच्या वतनाचीं गांवें मलवडी महालांत ६० व ललगुण महालांत

२२ मिळून एकंदर ८२ होतीं. ह्या गांवांबद्दल पुढें तंटा लागला. तेव्हां ह्यांचे आप्त वणंगोजी निंबाळकर ह्यांनीं, विजापुरचा वजीर कामीलखान ह्याच्या मार्फत, त्या गांवांची वांटणी करून दिली. त्यांत ५ गांव वडीलपणाचे शिक्क्याकरितां राखून, प्रत्येक मुलास ११ प्रमाणें गांव दिले. ही वांटणी इ० स० १५६६ मध्यें झाली. ह्यानंतर बाळोजीचे पुत्र बाबजी व मिटोजी हे विजापूर दरबारांत फार योग्यतेस चढले. निजामशाहीचा दिवाण मलिकंबर ह्यानें विजापुरच्या सैन्यावर चढाई करून तें पाडाव करण्याचा अनेक वेळां प्रयत्न केला. त्या वेळींच त्याच्याशीं टक्कर देऊन, विजापुरचें स्वातंत्र्य संरक्षण करण्याचे कामीं, हे बाबजी घाटगे व त्यांचे बंधु फार उपयोगीं पडले. मलिकंबरनें एके वेळीं विजापुरच्या सैन्यावर छापा घालून, रणदुल्लाखान, मनसूरखान, खैरतखान, याकूबखान, मुज्यातखान, रहमतखान, तागोजी पांढरे आणि पदाजी खाटे असे नामांकित वजीर पकडून, दौलताबादच्या किल्ल्यामध्यें बेड्या घालून कैदेंत ठेविले. त्या वेळीं विजापुरचा अल्ली पादशाहा बहुत दिलगीर झाला. त्या वेळीं बादशाहापाशीं खवासखान हुकमतपन्हा होता. त्यानें व मुरार जगदेव ह्यांनीं बादशाहासीं अर्ज करून, नामांकित मराठे शिलेदार व मनसबदार जमवून, मलिकंबरावर स्वारी करण्याची परवानगी घेतली. ह्या वेळीं ज्या मराठे शिलेदारांस वजिरीचीं वस्त्रें प्राप्त झालीं, त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें:—अंबाजी पदाजी घाटगे, साबाजी घाटगे, छमवा घोरपडे, कान्होजी चव्हाण, बाबजी झुंजारराव घाटगे, ह्या मराठे वीरांनीं दौलताबादेवर हल्ला करून आपले वजीर सोडविले. मलिकंबर इ. स. १७२६ मध्यें मृत्यु पावला. त्या अर्थी ही हकीकत त्याअगोदर घडली असावी. मलिकंबरच्या कारकीर्दीत विजापूर, अहमदनगर आणि गोव-

ळकोंडें येथें बर्गे शिलेदारांचें फारच प्रस्थ माजलें होतें; व ते प्रत्येक लढाईत आपल्या शूरपणानें मुसलमानी सैन्यांस लाजवीत होते. त्यामुळें हबशी व मोंगल सैन्यापेक्षां त्यांची योग्यता अधिक वाढून, त्यांना सैन्यांतील उच्च प्रतीचे अधिकार, मानमरातब, आणि जहागिरी देण्याचा एकसारखा क्रम सुरू झाला होता. निजामशाहीमध्यें जाधव व भोंसले उदय पावले, व आदिलशाही-मध्यें घाटगे व घोरपडे हे ह्याच वेळीं नांवलौकिकास चढले. जहानगीर बादशाहा मोंगलसैन्य घेऊन ह्या वेळीं दक्षिणेंत आला होता. त्यानेंही मलिकंबराचा पराभव करण्याकरितां आदिलशाही व कुतुबशाही सैन्यांची ह्मणजे विशेषेंकरून बर्ग्योंची मदत घेतली होती. त्यानें आपल्या रोजनिशीमध्यें बर्ग्योंच्या लढाऊपणाबद्दल फार तारीफ केली आहे. ह्या सर्व युद्धांमध्यें बाबजी घाटगे व त्यांचे भाऊबंद इतर घाटगेमंडळ ह्यांचें चांगलें अंग असावें असें दिसून येतें. परंतु त्यांचा इतिहास उपलब्ध नसल्यामुळें त्याबद्दल विशेष माहिती देतां येत नाहीं.

ग्रांटडफ् साहेबांनीं, माणदेशची देशमुखी व झुंजारराव हें पद इ. स. १६२६ मध्यें नागोजी घाटगे ह्यांस विजापुरचा बादशाहा इब्राहिम आदिलशाहा ह्यानें दिलें, ह्मणून उल्लेख केला आहे. परंतु तें नागोजी घाटगे ह्यांस न मिळतां, बाबजी घाटगे ह्यांस मिळालेलें आहे. बाबजीनें अनेक झुंजें करून विजापूर-दरबारीं फारच वाहवा मिळविली; ह्मणून बादशाहानें संतुष्ट होऊन झुंजारराव हा किताब दिला. ह्या बाबजी झुंजारराव घाटग्याची जी माहिती मिळते, तिच्यावरून ह्यास उदयास आण-ण्यास एक तपस्वी ब्राह्मण कारण झाला असें दिसतें. त्याचें नांव परशुरामभट असें होतें. ह्यास बाबजी ह्यानें एके दिवशीं विनंति केली कीं, "तुह्मी थोर तपस्वी आहां. कांहीं अनुष्ठान

करून, आमचें ऊर्जित होऊन भाग्याची वृद्धि होय सारखें करावें." त्यावरून परशुरामभट ह्यांनीं श्रीरामेश्वर प्रांत खटाव येथें श्रीजवळ अनुष्ठान केलें. तेव्हां श्रीनें साक्षात् प्रसन्न होऊन सांगितलें जे, "विजापुरास जाऊन अंबरखान याची भेट घेणें. त्याचे हातून इब्राहिम जगद्गुरु पादशाहास भेटवितील. दौलत अक्षयी होईल. चिंता नाहीं." नंतर श्रीच्या अनुष्ठानाची सांगता करून बाबजी घाटगे व परशुरामभट बुधास आले, व सु-मुहूर्त पाहून स्वार होऊन विजापुरास गेले. तेथें हजरतीची मुलाजमत होऊन बाबजी ह्यांचा दरबारांत प्रवेश झाला; व त्यांस सात लक्ष होनांची दौलत प्राप्त झाली. त्यांचे कुलगुरु श्रीपरशुरामभट हे त्याजबरोबर सदैव असत. ते त्यांस संकटप्रसंगीं वारंवार धीर देऊन व श्रीचा आशीर्वाद देऊन त्यांचें कल्याण चिंतीत असत. ह्या त्यांच्या उपकारास्तव बाबजी झुंजारराव ह्यांनीं त्यांस मौजे सांवडें व मौजे रेठरें प्रांत पन्हाळा हीं दोन गांवें मुकासा करून दिलीं व त्यांस दिवटी व छत्री दिली. पुढें बाबजी घाटगे लौकिक संपादन करून इ. स. १६४१ सालीं मृत्यु पावले. त्यांस दावजी व राजजी राजे असे दोन पुत्र होते. ह्यांपैकीं दावजी राजे ह्यांस निजामशाहीचे दिवाण शहाजी राजे भोंसले ह्यांनीं बाबजी झुंजाररावाच्या नांवलौकिकावरून आपली मुलगी दिली होती. हेच दावजी राजे पुढें आपल्या वडिलांची दौलत व कारभार पाहूं लागले. बाबजी राजे ह्यांचा दिवाण आवजी मावजीनामक एक मातबर मनुष्य होता. त्याचा व दावजी राजे ह्यांचा किलाफ झाला, व त्यामुळें विजापुरच्या बादशाहाची गैरमर्जी झाली. त्यावरून ते शहाजी राजे भोंसले ह्यांच्या वतीनें भागानगरास गेले व कुतुबशाहीमध्यें सरदारी करूं लागले. परंतु तेथें लवकरच त्यांचा काळ झाला. दावजी राजे ह्यांचे

पश्चात् त्यांचे बंधु राजजी राजे हे पुनः विजापुरच्या बादशाहाकडे गेले; व तेथें त्यांनीं आपल्या वडिलांचे गुरु परशुरामभट ह्यांचे चिरंजीव वेदंभट ह्यांच्या साहाय्यानें पुनः बादशाहाची भेट घेऊन व त्यांस स्वपराक्रमाचें अद्वितीय तेज दाखवून, पुनः झुंजारराव हा किताब व बापाची जहागीर परत मिळविली. ह्या पुरुषानें विजापुरच्या बादशाहीची एकनिष्ठपणें आमरण सेवा केली. ह्यास वेदंभटाचें प्रत्येक राजकारणांत उत्कृष्ट साहाय्य झालें. ह्याजकडे विजापुरच्या एका पठाणाचें बरेच होन कर्ज होतें ह्मणून त्यानें त्याबद्दल त्यास तगादा लाविला; व त्याकरितां एक माणूस ओलीस मागितला. त्या वेळीं हे वेदंभट पठाणाच्या घरीं सात दिवस अन्नपाण्यावांचून ओलीस राहिले. पुढें राजजी राजे ह्यांनीं कर्जाचा निकाल करून त्यांची मुक्तता केली. अशी कस्त मेहनत त्यांनीं फार केली. राजजी राजे ह्यांच्याच कारकीर्दींत महाराष्ट्रराज्यसंस्थापक शिवाजी राजे अवतीर्ण झाले; व विजापुरकरांचे किल्ले व मुलूख घेऊन स्वराज्याचा पाया घालूं लागले. परंतु राजजी राजे त्यांस बिलकूल सामील झाले नाहींत. शहाजी भोंसले ह्यांनीं दावजी घाटगे ह्यांस आपली मुलगी दिली होती; व त्यांचे भाऊबंद नागोजी बिन मालोजी घाटगे ह्यांस, कर्नाटकांतील आपल्या बंगलोरच्या जहागिरींत इ. स. १६३७ सालीं बंगलोर किल्ल्याचे नामजाद नेमिलें होतें. एवढेंच नव्हे, तर त्यांना ह्या घाटगे घराण्याचें विशेष अगत्य असून, त्यांनीं मालोजी साबाजी व राजजी झुंजारराव ह्यांच्यामधील तंटा निवडिला होता. तथापि त्यांचे पुत्र शिवाजी राजे हे ज्या वेळीं पुंडावे करूं लागले, त्या वेळीं हे त्यांच्या विरुद्ध होऊन लढूं लागले. बादशाही मनसबदारी व बादशाही मानमरातब ह्यांस भुलल्यामुळें त्यांच्या मनावर शिवछत्रपतीच्या पवित्र

हेतूचा प्रकाश पडला नाहीं ह्मणून ह्मणा; किंवा बादशाहाची इमानें इतबारें सेवा करून आपल्या स्वामिनिष्ठेंत अंतर पडूं द्यावयाचें नाहीं ह्मणून ह्मणा; त्यांनीं, विजापूर दरबारांतून शिवाजीवर ज्या स्वाऱ्या झाल्या, त्यांत जातीनिशीं हजर राहून, खाविंदचरणांची निस्सीम सेवा करण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं. प्रतापगड येथें अफजुलखानाचा वध झाल्यानंतर त्याच्या सैन्याची व शिवाजी राजाची जी लढाई झाली, त्या लढाईत, खानाच्या बाजूनें लढण्याकरितां, स्वतःच्या जमेतीनिशीं राजजी झुंजारराव घाटगे व शिवाजीचे भाऊबंद मंबाजी भोंसले व त्यांचे भाचे नरसोजी खडांगळे हे हजर होते! ह्या सर्वांचा पराभव होऊन त्यांचें सैन्य व हत्तीघोडे शिवाजीनें पाडाव केले; व त्यांस कैद करून वांईस नेलें. तेथें कांहीं दिवस ठेवून घेऊन, पुढें त्यांचा वध न करितां त्यांस शिवाजीनें सोडून दिलें*! व जातांना राजजी झुंजारराव ह्यांस अलमगुमान घोडा व एक तरवार बक्षीस दिली व खडांगळे ह्यांसही त्याप्रमाणें बक्षीस दिलें. शिवाजीच्या हातून जीव घेऊन निसटतांच, ह्या दोन्ही सरदारांनीं पुनः सैन्य जमविलें व विजापुरास जाऊन बादशाहाची रजावंदी केली. बादशाहानें खुष होऊन त्यांना पुनः वजिरीचें पद दिलें; आणि

---

*ग्रांटडफ् साहेबांनीं ह्या गोष्टींचा उल्लेख केला आहे. परंतु त्यांना ह्या इसमांचीं नांवें देतां आलीं नाहींत.

"The most distinguished Mahratta taken was Joojhar Rao Ghatgay, whose father had been the intimate friend of Shahajee; but Shivajee could not induce him to depart from his allegiance to Beejapoor, he was therefore permitted, at his own request, to return, after he had been honourably dismissed with valuable presents."

—*Grant Duff's History. Page* 78.

झांबडझुंब हत्ती, घोडा, मोत्यांचा तुरा व पदक वगैरे बहुमान देऊन दौलत मुकरर करून दिली; व कारवें, जेहाचें तासगांव व तुळजापूर व कोरेगांव प्रांत वांई हे मोकासे मुकरर करून दिले. पुढें बादशाहानें, शिवाजीनें पन्हाळा घेतला तेव्हां पन्हाळ्यावर स्वारी करण्याकरितां, सिद्दी जोहार सलाबतखान ह्याजबराबर दहा बारा हजार घोडेस्वार देऊन पाठविले. त्याच्या हाताखालीं राजजी झुंजारराव घाटगे नामजाद करून पाठविले होते. त्यांनीं पन्हाळ्यास वेढा घातला. परंतु शिवाजीराजे "काहीं पैके देऊन गडावरून कोंकणांत पळून गेले. पुढें भोंसल्यांनीं विलायतेमध्यें (स्वदेशामध्यें) तमाम मुलूख मारून, कबज करून, डोहणा केला." ह्मणून त्यांचे पारिपत्यार्थ, रुस्तुमजमा व घोरपडे, महमद एखलासखान, हुकमतपन्हा, राजजी झुंजारराव, बजाजी बिन मुधोजी नाईक, असे बाजे वजीर देऊन, त्यांच्या बरोबर मैलागिरी अनंत पेशवे, गंगाराम दबीर, गिरमाजी यशवंतराव मजमदार व शेखमहमद अस्मान चिडा असे कामदार व तीन हजार स्वार देऊन रवानगी केली. परंतु शिवाजीनें त्यांची डाळ शिजूं दिली नाहीं. तात्पर्य, इ. स. १६८० पर्यंत राजजी झुंजारराव शिवाजीचा पाठलाग करीत होते. पुढें इ. स. १६८२ ह्या वर्षीं त्यांचा अंत झाला. राजजी राजे ह्यांस सहा पुत्र होते. त्यांपैकीं पदाजी राजे हे दौलतीचे अधिकारी झाले. हे आपल्या बापाप्रमाणेंच यवनांची सेवा करीत होते. शिवाजीच्या पश्चात् औरंगजेबानें जें धुमाकूळ मांडलें, त्या वेळीं हे विजापूरकराकडून निघून औरंगजेबास येऊन मिळाले. ह्या वेळीं औरंगजेबानें त्यांस कसबे मलवडी, खटाव व बुध वगैरे ठिकाणचे ठाणेदार व फौजदार नेमिलें. परंतु ह्यांचे कुलोपाध्याय परशरामभट बिन वेदंभट ह्यांनीं त्यांचें मन वळवून, त्यांजकडून मोंगलांचा पक्ष सोडविला.

व स्वतः चंदीस जाऊन राजारामास मदत करून, पदाजी घाटगे ह्यांची कन्या अंबिकाबाई राजारामाचा पुत्र शिवाजी ह्यास करण्याचें वचनप्रमाण घेतलें. हें लग्न पुढें राजाराम मृत्यु पावल्यानंतर ताराबाईचे कारकीर्दींत रांगणा येथें झालें. पदाजी राजे महाराष्ट्रधर्म व महाराष्ट्रराज्य ह्यांचा अभिमान बाळगून राजारामाच्या पक्षास मिळाले; ह्मणून राजारामानें पदाजीस कसबे दिकसळ व कसबे बोथें हीं दोन गांवें इनाम दिलीं. चंदीच्या लढाईंत पदाजी स्वतः हजर होते किंवा नाहीं, ह्याची माहिती मिळत नाहीं. परंतु त्यांचा शंकराजी बिन मकाजी घाटगे हा एक भाऊबंद चंदी येथें राजारामाच्या फार उपयोगीं पडला असें दिसतें. पदाजी घाटगे मराठ्यांच्या पक्षास ह्या वेळीं मिळाले होते, हें सिद्ध करण्यास ग्रांटडफ् साहेबांनीं दिलेला एक साधार पुरावा आहे. त्यांनीं, खटावच्या ब्राह्मण देशमुखानें इ. स. १६८८–८९ ह्या सालीं मोंगल सुभेदारास लिहिलेलें एक फारसी पत्र दिलें आहे. त्यांत त्यानें, "पदाजी घाटग्याचा व फलटणकराचा शरीरसंबंध आहे व फलटणकर व ते एक आहेत; व ते शत्रूच्या पक्षाचे आहेत. तेव्हां मलवडी व बुध येथील ठाणेदारचा अधिकार त्याजकडून आपणास द्यावा; ह्मणजे तुमच्या प्रांताचें संरक्षण होईल." अशी स्वार्थाची मागणी केली आहे. ह्यावरून पदाजी राजे मराठ्यांस पूर्ण अनुकूळ होते ह्यांत शंका नाहीं. औरंगजेबाकडून आपली देशमुखी साधण्याकरीतां ते त्यास मध्यंतरीं वश झाले होते; परंतु त्यांनीं मोंगलांचा प्रांत लुटण्यास कमी केलें नाहीं. पदाजींस नागोजी ह्मणून पुत्र होता. तो पुढें शाहूमहाराजांस मिळाला व हें मुसलमानी अंमलांतील प्रसिद्ध घराणें छत्रपतींच्या राजछत्राखालीं आलें.

# शिर्के राजे.

शिर्के हे महाराष्ट्रांतील अति प्राचीन क्षत्रियकुलांतील मराठे आहेत. ग्रांटडफ् साहेबांचें ह्यांच्या संबंधानें असें मत आहे कीं, ज्या वेळीं १३ व्या शतकाच्या मध्यंतरीं शिंगणराजानें पन्हाळयाच्या राजाचें राज्य पादाक्रांत केलें, त्या वेळीं कृष्णेच्या उगमासभोंवतालचा प्रांत ज्या पाळेगारानें घेतला, त्याचे वंशज हे शिर्के असावेत. शिर्क्यांसंबंधानें प्राचीन माहिती अद्यापि उपलब्ध नसल्यामुळें त्यासंबंधानें अधिक चर्चा करितां येत नाहीं. मुसलमान इतिहासकार फेरिस्ता व 'बुऱ्हान-इ-माआसिद' ह्या ग्रंथाचा कर्ता अलीबिन आझिझअली ह्या दोघांनीं ब्राह्मणी राज्याची जी हकीकत दिली आहे, तींत, शिर्के नामक एका मराठे सरदारानें संगमेश्वरच्या आसमंतांतील निबिड अरण्यांत मलिक-उल्-तिजार ह्या सरदारास इ. स. १४५४ सालीं भूल दाखवून सैन्यासह गारत केलें, अशी माहिती दिली आहे. कोंकण प्रांतांत शिर्के मराठे हे डोंगरी किल्ल्याच्या आश्रयानें फार प्रबल झाले होते; व ते समुद्रांत व खुषकीवर लूटमार करून मुसलमानांना फार त्रास देत असत. ह्मणून मलीक-उल् तिजार हा सरदार तीस चाळीस हजार सैन्यानिशीं त्यांवर चालून गेला होता. त्यानें मोठ्या युक्तीनें शिर्के सरदारास पकडलें; व त्यास "मुसलमान होतोस, कां शिरच्छेद करूं?" असा प्रश्न विचारला. ज्या वेळीं प्राणावरच संकट आलें, त्या वेळीं त्यास बाह्यात्कारें मुसलमानी धर्म स्वीकारणें भाग पडलें, परंतु तो पुरा वस्ताद असल्यामुळें, त्यानें त्या सरदाराशीं बाह्यात्कारें, गोडीगुलाबीनें व नम्रपणानें वागून, त्याची मर्जी संपादन केली; व गुप्तरीतीनें आपल्या मराठे सैन्यास इशारत करून, त्या सरदारास पुरें शासन करण्याचा संकल्प केला. मलिक-उल्-तिजार ह्याच्या ताब्यांत तो प्रांत लवकर येईना. तेव्हां ह्या शिर्के सर-

दारानें बरीशी संधि साधून, "संगमेश्वरच्या डोंगरांतील व अरण्यांतील सर्व गुप्त वाटा मला माहित आहेत. तेव्हां मी तुह्मांस कोंकणप्रांत हस्तगत करून देतों, आणि सर्व हिंदुसैन्याची खोड मोडून टाकितों." अशी थाप मारिली. मलिक-उल्-तिजार ह्यास दुर्दैवानें ही गोष्ट खरी वाटली; व त्यानें त्याच्यावर विश्वास ठेवून, सर्व सैन्यानिशीं, तो जिकडे नेईल तिकडे, कूच करण्याचा बेत ठरविला. आझिझअली ह्या इतिहासकारानें लिहिलें आहे कीं, मलिक फार शाहणा व धूर्त सरदार होता. परंतु दैव फिरल्यामुळें अशी दुर्बुद्धि त्यास आठवली. आणि त्यानें कोणाचाही हितमंत्र न ऐकतां, त्या शिर्क्यांची मसलत मान्य करून, यमपुरीचा मार्ग धरिला. शिर्क्यानें, मराठे लोक जवळच्या दऱ्याखोऱ्यांत लपले आहेत असें सांगून, त्याचें सैन्य चांगलें माऱ्याच्या जागीं नेलें, आणि आपल्या पूर्वीच्या जातभाईस इशारा करून त्या सैन्याची अगदीं दाणादाण केली. ह्यापुढें शिर्क्यांची हकीकत काय झाली ती समजत नाहीं. तथापि, पुढें एक शतकपर्यंत त्यांचें घराणें कोंकणांत स्वतंत्र व बलाढ्य असावें असें दिसतें.

शिर्क्यांसंबंधानें उपलब्ध झालेल्या माहितीवरून असें दिसतें कीं, ह्या घराण्यांतील वाघोजी राजे शिर्के नांवाचे पुरुष निजामशाहा बादशाहाच्या कारकीर्दींत उदयास आले. त्यांची कर्तृत्वशक्ति पाहून निजामशाहानें त्यांस रायरी ऊर्फ रायगड ह्या प्रांताच्या बारा महालांची सरदेशमुखी करून दिली. महाराष्ट्रांत प्रथम अंमल करणाऱ्या दक्षिणच्या मुसलमान बादशाहांनीं जागजागच्या प्राचीन रहिवाश्यांचीं वतनें मुळींच घेतलीं नाहींत. उलट, त्यांचीं त्यांस तीं परत करून, त्यांना अनुकूळ करून घेतलें. त्यामुळें मुसलमानी अंमल झाला तरी शिर्क्यांच्या वतनांत अडथळा आला नाहीं. पुढें वाघोजी राजे हे व त्यांचे चिरं-

जीव तान्हाजी राजे हे निजामशाहीमध्यें बादशाही मनसब अनुभवूं लागले. त्यामुळें चाकरीच्या निमित्तानें रायरी प्रांताच्या वतनावर त्यांनीं एक दलपतराव नामक पाताणे प्रभू जातीचा मुतालिक ठेविला होता. परंतु पुढें अहमदनगरच्या बादशाहाचा व विजापुरच्या बादशाहाचा विग्रह झाला व शिर्के हे विजापुरच्या विरुद्ध पुंडाई करूं लागले. तेव्हां बादशाहानें, जावलीकर चंद्रराव मोरे ह्यांस इ. स. १५७८ सालीं कोंकणांत शिर्क्यांवर पाठवून, त्यांचा रायरी किल्ला काबीज केला. तथापि शिर्क्यांच्या सरदेशमुखीचें वतन त्यांनीं जप्त केलें, असें दिसत नाहीं. मात्र त्यांनीं मुतालिक तोच सरदेशमुख करून, वतनाचा भोगवटा दलपतरावाकडे चालविला. वाघोजी राजे बादशाही मनसबदार असल्यामुळें त्यांची कोंकणप्रांतामध्यें चांगली योग्यता होती. त्यामुळें त्यांचा व शृंगारपुरचे सूर्याजी राजे सुर्वे ह्यांचा शरीरसंबंधही झाला होता. सुर्वे राजे ह्यांची कन्या वाघोजीचे धाकटे पुत्र पिलाजी राजे ह्यांस दिली होती. हे सुर्वे विजापुरच्या बादशाहाचे मनसबदार असल्यामुळें त्यांनीं आपल्या वशिल्यानें आदिलशाहा बादशाहाकडून त्यांस दाभोळचें सरदेशमुखीचें वतन मिळवून दिलें होतें. परंतु शिवाजीनें कोंकणप्रांत काबीज केल्यामुळें ह्या वतनाचा भोगवटा झाला नाहीं. कोंकणचे राजे हे बलिष्ठ शिर्के सरदार आपणांस अनुकूल करून घ्यावे, ह्मणून शिवाजीनें पिलाजीराव ह्यांचे पुत्र गणोजीराव ह्यांस आपली कन्या राजकुंवरबाई दिली; व पिलाजीराव शिर्के यांची कन्या येसूबाई संभाजी राजास करून घेतली, अशी माहिती सांपडते. कोंकणप्रांतामध्यें वाडीचा लक्ष्मण सांवत फसालत करून वसाहत होऊं न देई, ह्मणून पिलाजी राजांनीं सांवतास आणून शिवाजीचा व त्याचा तह करून दिला. त्या वेळीं शिवाजी म-

हाराजांनीं राजकुंवरबाईस जो पुत्र होईल त्यास दाभोळचें वतन देऊं असें वचन दिलें. पुढें शिवाजी महाराजांच्या पश्चात् संभाजी महाराज मराठी राज्याचे अधिकारी झाले. त्यांनीं हलकट व नीच लोकांच्या संगतीस लागून सर्व राज्याची घडी विसकटून टाकिली, व कर्त्या माणसांस देशोधडीस लाविलें. त्या वेळीं मराठी राज्य रक्षण व्हावें ह्या उद्देशानें, पिलाजीराजे शिर्के, गणोजीराजे शिर्के व तान्हाजीराजे शिर्के ह्यांनीं, संभाजी महाराजांचा पुत्र शिवाजी ह्यास गादीवर बसवून संभाजी महाराजांस पदच्युत करावें, व सर्व राज्यकारभार पूर्वींच्या जुन्या व अनुभवी मुत्सद्दीमंडळाकडून चालवावा, अशी गुप्त मसलत केली. परंतु कोणीं ती संभाजी महाराजांस कळविली. त्यामुळें त्यांच्या क्रोधाची परमावधी होऊन, त्यांनीं सर्व शिर्क्यांचा समूळ उच्छेद करावा, असा हुकूम केला. त्याप्रमाणें शिर्क्यांचें झालेलें 'शिरकाण' इतिहासवाचकांस विदित आहेच. जेव्हां शिर्केमंडळाचा वध झाला, तेव्हां फक्त दोन तीन असामी पळून हबशांच्या मुलखांत जाऊन राहिले, व त्यांनीं मोंगलांची चाकरी पतकरिली. शिवाजी महाराजांचे जांवई गणोजीराजे हे ह्या शिरकाणांतून जीवंत राहिले होते. त्यांनीं राजाराम महाराजांस चंदीच्या संकटप्रसंगीं साहाय्य करून, झुल्पिकारखानाच्या वेढ्यामधून ताराबाई, राजसबाई व राजकुंवरबाई ह्या राजस्त्रियांची एका रात्रींत सुटका करून त्यांस अरणीच्या किल्ल्यांत आणून ठेविलें व त्यांचें प्राणरक्षण केलें. ह्या उपकाराबद्दल राजाराममहाराज फार संतुष्ट होऊन त्यांनीं त्यांस दाभोळच्या सरदेशमुखीच्या सनदा करून दिल्या. येणेंप्रमाणें ह्या शिर्के घराण्यानें स्वराज्यास उत्कृष्ट मदत केली. ह्यांचे वंशज अद्यापि कोंकणांत आहेत. ह्या घराण्याचा व साता-

रच्या छत्रपतींचा पुढें अनेक वेळां शरीरसंबंध झाला असून, तें छत्रपतींच्या दरबारांत वरिष्ठ प्रतीचें गणलें जात असे.

## मोहिते.

भोंसले व निंबाळकर ह्या घराण्यांप्रमाणें मुसलमानी अमदानीमध्यें उदय पावून, मराठेशाहीमध्यें प्रख्यात झालेलें असें, प्राचीन हिंदुघराणें मोहिते हें एक होय. ह्याचा इतिहास अगदीं उपलब्ध नाहीं. 'बुसातिनेसलातीन' व 'खुलासत-उल्-दिल्ही' वगैरे फारसी तवारिखांमध्यें ह्या घराण्याचा थोडा उल्लेख आला आहे. त्यावरून मोहिते हे दिल्लीच्या प्राचीन चव्हाण रजपूत राजांचे वंशज होते असें दिसतें. हिंदुस्थानांत मुसलमान लोकांच्या स्वाऱ्या होऊन दिल्लीचें हिंदुसार्वभौमत्व नष्ट झाल्यानंतर ह्या घराण्याचे वंशज रजपुतान्यांत हाडोती प्रांतांत राहिले; ह्मणून त्यांस हाडे हें नांव पडलें. पुढें हे हाडे चव्हाण दिल्लीच्या मुसलमान बादशाहांच्या कारकीर्दींत उदयास येऊन त्यांनीं आपल्या रणशौर्यानें बादशाहास संतुष्ट केलें. ह्यामुळें त्यांस बादशाहाकडून मोठमोठ्या किताबती व राजचिन्हें मिळालीं. त्याच वेळीं त्यांस 'मोहिते' हा किताब मिळाला. मोहिते हा आरबी भाषेंतील शब्द असून त्याची उत्पत्ति मोहिम ह्या शब्दापासून झाली आहे. ह्याचा अर्थ 'रण जिंकणारा,' 'विजयी' असा आहे. हें घराणें पुढें उत्तरेकडून दक्षिणेंत आलें, व दक्षिणेंतील मुसलमानी रियासदीमध्यें नांवलौकिकास चढलें. ह्या घराण्याची साद्यंत हकीकत सांपडत नाहीं, ही दुर्दैवाची गोष्ट होय. तथापि, ह्या घराण्यांतील रंगराव चव्हाण मोहिते नामक एक इसम विजयनगरच्या रामराजाशीं झालेल्या तालीकोटच्या लढाईंत इ. स. १५६४ सालीं मुसलमानांच्या वतीनें

लढत होता, असा उल्लेख सांपडतो. पुढें शहाजी भोंसल्याचा उदय होईपर्यंत मोहिते घराण्याची बिलकूल माहिती सांपडत नाहीं. तथापि, विजापूर व अहमदनगर ह्या दोन बादशाहांच्या अंमलामध्यें ह्या घराण्यांतील पुरुष बरेंच स्वातंत्र्य व प्राबल्य अनुभवीत होते असें दिसतें. नीरा आणि वारणा ह्या नद्यांच्या दरम्यान जो मुलूख होता, तो कोंकणचे राजे शिर्के ह्यांच्या ताब्यांत होता. तो सर करण्याकरितां, व गुजर, मामुलकर, मोहिते व महाडीक ह्या शिरजोर मराठ्यांस नतिजा देण्याकरितां, विजापुरचा बादशाहा युसफ आदिलशाहा ह्यानें चंद्रराव मोरे नामक सरदार इ. स. १५७८ सालीं पाठविल्याचा उल्लेख आहे. त्यावरून मोहित्यांचें बरेंच प्राबल्य त्या वेळीं होतें, हें उघड आहे. शहाजी भोंसले ह्यांनीं लुकजी जाधवरावांवर असंतुष्ट होऊन, मोहित्यांची कन्या तुकाईआवू इजबरोबर आपला दुसरा विवाह केला. हिच्या बापाचें नांव बाजी मोहिते पोगरवाडीकर असें होतें, असा एके ठिकाणीं उल्लेख आढळतो. परंतु तें तिच्या भावाचें नांव असावें असें दिसतें. कोठें कोठें त्याचें नांव संभाजी मोहिते असेंहि आढळतें. इ. स. १६४६ सालीं तुकाबाईचा भाऊ बाजी मोहिते हा पुणें जिल्ह्यांतील सुपें महालाचा अधिकारी असून, तो ३०० घोडेस्वार बाळगून शहाजीच्या वतीनें विजापुरच्या बादशाहीची एकनिष्ठ सेवा करीत होता असा उल्लेख सांपडतो. शिवाजीनें सुपें प्रांत घेतला, त्या वेळीं त्यानें त्यास वश करण्याच्या प्रयत्न केला; परंतु तो वश झाला नाहीं. ह्मणून त्यानें त्यास कैद करून कर्नाटकांत पाठवून दिलें. प्रत्यक्ष शिवाजीचा तो मामा होता, परंतु शिवाजीच्या पुंडाव्यास त्याचें साहाय्य नसून, त्याचा सर्व ओढा विजापुरच्या बादशाहीकडे होता. परंतु पुढें ह्या मोहिते घराण्यास अनुकूल करून

घेणें शिवाजीस भाग पडलें. हंसाजी मोहिते नामक मोहिते घराण्यांतील पराक्रमी पुरुष शिवाजीस साहाय्य झाला, व त्यानें आपलें अप्रतिम युद्धकौशल्य दाखवून शिवाजीस प्रसन्न केलें. शिवाजीनें त्यास 'हंबीरराव' हा किताब व सरनोबत हें सेनाधिपतीचें मुख्य पद अर्पण केलें. हंबीरराव मोहिते हे मराठ्यांच्या इतिहासांत फार प्रख्यात आहेत. मोहिते घराण्याचा व शिवाजीचा प्रत्यक्ष शरीरसंबंध झाला असल्यामुळें त्यास शिवाजीविषयीं अगत्य व कळकळ उत्पन्न झालीं असावीं असें दिसतें. शिवाजीची दुसरी बायको सोयराबाई ही मोहित्यांचीच मुलगी होती. साताऱ्च्या छत्रपतींचे मोहित्यांशीं पुढें अनेक वेळां शरीरसंबंध झाले असून हें घराणें छत्रपतींच्या आप्तवर्गांत अद्यापि श्रेष्ठ समजलें जातें.

## म्हसवडचे माने.

मुसलमानी अमदानीमध्यें घाटगे ह्यांच्या घराण्याप्रमाणें माने ह्यांचें घराणेंही बहुत पुरातन आहे. ह्याचा मूळ पुरुष पाठकोजी म्हणून होता. तो म्हसवड येथील देशमुखी करीत होता. दुर्गादेवीचा दुष्काळ संपल्यानंतर त्या प्रांतांमध्यें बेरड, पाळेगार, रामोशी वगैरे लोकांची जी पुंडाई माजली होती, तिचा बंदोबस्त करण्याचे कामीं हा झटत होता, अशी माहिती मिळते. ह्या पुंडखोर लोकांचें बंड मोडण्यांत, महादू नामक एका बेरडानें त्याचा अंत केला. त्यास सिदोजी नांवाचा एक नऊ वर्षांचा लहान मुलगा होता. त्यानें आपल्या बापाचा सूड घेण्याचा निश्चय केला. म्हसवड महालावर सुजातमिया नांवाचा एक बादशाही अंमलदार तमाम ठाणीं बसविण्याकरितां आला होता. त्यास अनुकूल होऊन सिदोजीनें पुढें आपल्या विक्रमशक्तीचा प्रभाव दाखविला. त्यानें सुजातमियाच्या मार्फत विजापूर बादशाहीमध्यें प्रवेश करून

बहुत कीर्ति संपादन केली. सुजातमियास ह्या प्रांतांतून हुसकून लावून तो प्रांत घेण्याकरितां, हुसेनशा ह्मणून बेदरचा एक सुभा आला होता; व त्यास वणंगोजी नाईक निंबाळकर अनुकूल झाले होते. परंतु सिदोजी माने हा अनुकूल झाला नाहीं. त्यामुळें उभयतांची लढाई झाली. ती चांगली एकांगी होऊन तींत सिदोजीचे डोळ्याखालीं तरवारीची जखम लागली. परंतु त्यानें हताश न होतां, पथ्याची हूल चालवून प्रतिपक्षाचा पराभव केला. तेव्हां सुजातमियानें संतुष्ट होऊन, विजापूर दरबारीं सिदोजीची फार तारीफ लिहून पाठविली. "सिदोजी महाप्रतापी आहे. त्यानें एकांगी करून चार पांच लढाया जिंकल्या, व आपल्या प्रांतावरील परचक्र नाहींसें केलें. त्याची देशगत त्यास देऊन त्याची हुकमत वाढवावी." त्यावरून इब्राहिम बादशाहा ह्यानें त्यास भेटीस बोलाविलें; आणि त्याचा सत्कार करून त्यास तीनशें होनांची तैनात दरमहा चालू केली. पुढें कांहीं दिवसांनीं बेदरच्या बादशाहाकडील फौज भीमा उतरोन विजापुरावर चालून आली. त्या वेळीं सोलापुराजवळ त्या फौजेची व विजापुरच्या फौजेची मोठी लढाई झाली. त्या लढाईंत सिदोजीनें बहुत पराक्रम दाखविला. त्यामुळें त्याची विजापूर दरबारांत फार प्रतिष्ठा वाढून त्यास बाजीची किताबत मिळाली; व त्याचे विश्वासू साहाय्यकर्ते नरसिंहपंत केसकर ह्यांस विश्वासराव असा किताब मिळाला. ह्याप्रमाणें विजापूर दरबारांत त्यानें बहुत शिपाईगिरीचीं कामें केलीं व एका लढाईंत बदामी किल्ला सर केला. त्यामुळें त्याची फार ख्याति झाली. हा फार भगवद्भक्त असून मान्यांचें कुलदैवत श्रीसिद्धनाथ ह्याच्या पादुका व बटवा तो प्रत्येक स्वारीमध्यें जवळ बाळगीत असे व मग लढाईंत जात असे. ह्यास चिलोजी व नरसिंहराव असे पुत्र होते. ह्यांपैकीं नरसिंहरावास पुनः

सिदोजी, चमोजी, अम्रोजी, खेत्रोजी आणि रथाजी असे पांच पुत्र होते. ह्यांपैकीं रथाजी माने हे पुढें फार प्रख्यातीस आले. विजापुरच्या बादशाहीस उतरती कळा लागून त्या दरबारचे मुसलमान अधिकारी हिंदु सरदारांचा मत्सर करूं लागले, त्या वेळीं जे मराठे सरदार औरंगजेब बादशाहाच्या सैन्यास जाऊन मिळाले, त्यांपैकीं रथाजी माने हे एक होत. ह्यांनीं व ह्यांचे चिरंजीव नागोजी माने ह्यांनीं दिल्लीच्या सैन्यास पुष्कळ मदत केली. राजे जयसिंग हे दिल्लीच्या बादशाहापासून दक्षिणेंत सैन्य घेऊन आले, त्या वेळीं त्यांनीं रथाजी माने ह्यांचीच विशेष मदत घेतली; व बादशाहाजवळ त्यांची फार तारीफ केली. ह्मणून बादशाहानें मेहेरबान होऊन, त्यांस ह्मसवड, दहीगांव अकलूज, भालवणी, कामेगांव, ब्रह्मपुरी, सांगोलें, आटपाडी, नाझरें, बेलापूर, ह्या गांवांचें देशमुखी वतन दिलें. ह्या वेळीं सय्यद एखलास सर्जेखान ह्यानेंही बादशाहाजवळ रथाजी माने ह्यांच्या शौर्याबद्दल फार शिफारस केली होती. रथाजीराव माने वारल्यानंतर नागोजी माने ह्यांनीं औरंगजेबास आपली शिपाईगिरी दाखवून त्याजकडून राजा हा किताब व मोर्चेल मिळविलें.

औरंगजेबानें संभाजीचा वध केल्यानंतर बहुतेक महाराष्ट्र काबीज केलें; व छत्रपति राजाराम व इतर मराठे सरदार ह्यांचा पाठलाग करण्याकरितां, कर्नाटकांत झुल्पिकारखान ह्याच्या हाताखालीं सैन्य पाठविलें. त्यांत नागोजी माने हा रणशूर सरदार प्रमुख होता; व त्याच्या हाताखालीं एक हजार स्वारांची मनसब होती. हा प्रबल मराठा सरदार बादशाही सैन्यांत असल्यामुळें मराठ्यांना फार चिंता उत्पन्न झाली. बादशाही सैन्याचा भरणा विशेष असून, त्याच्या बाजूस नागोजीसारखे

मराठे वीर युद्धास सज्ज झालेले असल्यामुळें, शत्रूच्या सैन्याचा शह फार बळकट बसला. त्यामुळें महाराष्ट्रराज्य व महाराष्ट्र-धर्म खास बुडणार, अशीं चिन्हें मराठ्यांस दिसूं लागलीं. त्या वेळीं चंदी येथें, राजाराम महाराजांनीं, बादशाही सैन्यांतील मराठे सरदारांकडे संधान बांधून, त्यांस विनंति केली कीं, "मराठी धर्म राखिल्यास नीट. नाहींतर आज बुडतो. तुह्मी मराठी धर्माचे अगत्यवादी. त्यापक्षीं तुह्मीं आह्मांकडे यावें. तुह्मी आह्मी एक जाहल्यास ही फौज मोडून हिंदुधर्म जतन करूं." ह्याप्रमाणें विनंति करितांच, नागोजी माने ह्याच्या हृदयांत स्वधर्माभिमान प्रज्वलित झाला; व त्यांनीं मराठ्यांच्या बाजूस येऊन त्यांचें कार्य साधून दिलें. त्यामुळें छत्रपतीस संतोष झाला. व "नागोजीनें आज राज्य जतन केलें. एकनिष्ठ सेवक, चांगला माणूस, अशी तारीफ करून, पांचहजार फौजेनिशीं ठेविलें. ते वेळेस इकडील परांडे हवेली वगैरे सत्तावीस महालांचीं सरदेश-मुखीचीं वतनपत्रें, व इनाम गांवें दोनचार करून दिलीं." असा बखरीमध्यें उल्लेख आहे. राजाराम छत्रपति ह्यांनीं ह्या समयीं नागोजी माने ह्यांस एक अभयपत्र दिलें होतें. त्यांत "स्वस्तिश्री राज्यभिषेक १७ प्रजापति नाम संवत्सरे चैत्र बहुल नवमी, क्षत्रिय कुलावतंस श्री राजाराम छत्रपति यांनीं राजश्री नागोजी बिन रताजी माने यासी दिलें अभयपत्र ऐसीजेः— तुह्मी पूर्वीं तांब्राकडे होतांत. ऐसियास स्वामींचें राज्य ह्मणजे देवताभूमि. या राज्यास तांब्राचा उपद्रव न व्हावा; महाराष्ट्रधर्म रहावा; स्वामींच्या राज्याची अभिवृद्धि व्हावी; या उद्देशें स्वामींच्या पायासीं एकनिष्ठता धरून कर्नाटकांत चंदीचे मुक्कामीं स्वामीपासीं आलेती. येऊन विनंति केली जे, आपणास देशांत सरदेशमुखी वतन करून दिल्हें पाहिजे. ह्मणून ह्मसवड आदि

१२ महालांचें वतन करून दिलें." असा मजकूर आहे. असो. ह्यावरून ह्या मुसलमानी अंमलांत उदयास आलेल्या महाराष्ट्र घराण्यानें चंदीच्या बिकट प्रसंगीं मराठ्यांस उत्कृष्ट साहाय्य केलें ह्यांत शंका नाहीं.

नागोजी माने ह्या सुप्रसिद्ध सरदारावर संताजी घोरपडे ह्या नामांकित मराठे सरदाराचा वध केल्याबद्दलचा आरोप ग्रांटडफ साहेबांनीं लादला आहे. परंतु तो खरा नसून त्याची खरी हकीकत फार वेगळी आहे, एवढेंच येथें सांगणें भाग आहे. माने ह्यांचें घराणें सातारच्या छत्रपतींच्या अमलांत प्रसिद्ध होतें.



# भाग ५ वा.



## उपसंहार.

मागें निर्दिष्ट केलेल्या मुसलमानी अमदानींतील मराठे घराण्यांशिवाय भोंसले, जाधव, घोरपडे, मोरे, पवार, सांवत इत्यादि जुन्या घराण्यांचीही हकीकत महत्त्वाची, मनोरंजक आणि विचारार्ह अशी आहे. परंतु प्रकृत लेखांत तिचा समावेश करण्यास अवकाश नसल्यामुळें, ती येथें सादर केली नाहीं. तथापि घाटगे, निंबाळकर, माने, शिर्के, मोहिते, इत्यादि मराठी घराण्यांप्रमाणेंच तींही घराणीं, प्रथम मुसलमानी अमलांत उदय पावून, स्वतःच्या तेजानें, कर्तृत्वानें, पराक्रमानें आणि बुद्धिमत्तेनें पुढें सरसावून, यवनी दरबारांत सन्मान, अधिकार व प्रतिष्ठा ह्यांच्या शिखरास जाऊन पोहोंचलीं; आणि पुढें कालचक्राची गति पालटून अनुकूल संधि प्राप्त होतांच, त्यांतील एकानें स्वतंत्र हिंदुसाम्राज्य संस्थापित करून, आपलें क्षत्रियकुलावतंस ह्मणजे क्षत्रिय कुलाचा अलंकार हें नांव सार्थ केलें. भोंसल्यांचें नांव अखिल क्षत्रियकुलाचें अत्यंत तेजःपुंज आणि अत्यंत दैदीप्यमान असें शिरोभूषणच होय, ह्यांत शंका नाहीं. ह्या मराठे घराण्यांची मुसलमानी अमदानींतील माहिती दुसऱ्या भागांत प्रसिद्ध करितां येईल.

ह्या एकंदर माहितीचें लक्षपूर्वक मनन केलें, तर महाराष्ट्रराज्यसंस्थापनेचा पाया कसा तयार झाला, किंवा महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याचें बीजारोपण कसें झालें, ह्याची नीट कल्पना करितां येईल. शिवाजी महाराज अवतीर्ण झाल्यानंतर महाराष्ट्रमंडळ तयार झालें, किंवा महाराष्ट्रमंडळ तयार असल्यामुळें शिवनृप-

तीसारखा अलौकिक बुद्धिमान् पुरुष निर्माण झाला, व त्यानें देशकालप्रसंगाचा योग्य उपयोग करून राष्ट्रसंस्थापनेचें कार्य साधिलें, ह्याचा निर्णय ह्याच इतिहासानें उत्तम प्रकारें होईल. न्यायमूर्ति रानडे ह्यांनीं मराठ्यांच्या अभ्युदयाची किंवा महाराष्ट्रराज्यसंस्थापनेचीं जीं कारणें दिलीं आहेत, तीं साधक बाधक प्रमाणांनीं पडताळून पाहण्यास, ह्याच कालांतील इतिहासाचें संशोधन व परिशीलन केलें पाहिजे. दक्षिणेंतील मुसलमानांचा हिंदुधर्माविषयींचा सहिष्णुत्वभाव व त्यांचें मराठ्यांविषयींचें सस्नेह वर्तन हें मुख्यतः महाराष्ट्रांतील प्राचीन क्षत्रिय घराण्यांस उदयास येण्यास कारण झालें, हें ह्यावरून उघड होतें. तथापि, मुसलमानी सत्ता प्रस्थापित झाली, त्या वेळीं मराठ्यांची स्थिति किती निकृष्ट होती; पुढें मुसलमानांच्या सौम्य व उदार वर्तनामुळें त्यांचा उत्कर्ष कसा झाला; प्रथमतः त्यांचीं अंतःकरणें स्वार्थैकतत्पर असून आपलीं पुरातन वतनें जतन करण्यांत व बादशाही जहागिरी, मनसबा व मानमरातब मिळविण्यांत कशीं गुंगून गेलीं होतीं; नंतर शिवनृपति अवतीर्ण झाल्यावर त्यांत स्वाभिमानाची व स्वातंत्र्याची ज्योति कसकशी प्रज्वलित होत गेली, व तिचा प्रकाश त्यांच्यावर व त्यांच्या भावी पिढीच्या लोकांवर कसा पडत गेला; आणि राजारामाच्या कारकीर्दींत, चंदीच्या बिकट प्रसंगीं, त्याचा केवढा अपूर्व व लोकोत्तर परिणाम घडून आला; हेंही मुसलमानी अमलांतील मराठ्यांच्या इतिहासावरून कळून येणार आहे.

प्रस्तुत उपलब्ध झालेली माहिती फार त्रोटक व अपुरी आहे; तरी तिच्यावरून वरील मुद्यांचें चांगलें स्पष्टीकरण होऊन, कांहीं अश्रुतपूर्व व अनुपलब्ध गोष्टीही बाहेर आल्या आहेत. आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या बखरींत किंवा ऐतिहासिक कागदपत्रांत शिवाजी

महाराजांस मुली असल्याचा उल्लेख कोठेंहि सांपडत नाहीं. खुद्द छत्रपतींच्या दप्तरांतील वंशावळीमध्यें देखील ह्या मुलींचा नामनिर्देश नाहीं. परंतु पुष्कळ शोधावरून असें दिसतें कीं, एकंदर मराठ्यांच्या वंशावळीमध्यें मुलींचा नामनिर्देश बहुतकरून गाळलेला असतो. त्याप्रमाणें, शिवाजी महाराजांच्या मुलींचाही प्रकार झाला असावा. तथापि, चिटणीसांच्या नजरेंतून देखील ही गोष्ट वगळली जावी, हें फार चमत्कारिक आहे. बजाजी नाईक निंबाळकर ह्यांच्या पुत्रास दिलेल्या मुलीची माहिती फलटण संस्थानच्या दप्तरांतील पुराव्यानें सिद्ध झालेली आहे. व पिलाजीराव शिर्के ह्यांच्या मुलास दिलेल्या राजकुंवरबाईचा नामनिर्देश 'ग्रंथमालें'तील ऐतिहासिक पत्रांत आलेला आहे. त्याअर्थी ही गोष्ट केवळ अविश्वसनीय मानितां येत नाहीं. तथापि, हिचा अधिक शोध लावून पक्का निर्णय करणें जरूर आहे.

घाटगे, निंबाळकर, मोहिते, शिर्के आदिकरून मुसलमानी अमदानीमध्यें उत्कर्ष पावलेल्या सरदारांशीं शरीरसंबंध करण्यांत शिवाजी महाराजांचें चातुर्य व मुत्सद्दीपणाचें धोरण चांगलें व्यक्त होतें. तें मराठ्यांच्या इतिहासाचा तात्त्विक दृष्टीनें विचार करणारांस अवश्य ध्यानांत घेण्यासारखें आहे. दिल्लीपति अकबर ह्यानें शूर व पराक्रमी रजपूत सरदार अंकित करण्याकरितां ज्या खुबीदार तत्त्वावर त्यांच्या मुलींशीं विवाह केले, त्याच तत्त्वाचा शिवनृपतीच्या हृदयांत पूर्ण प्रकाश पडला होता, असें कबूल करणें भाग आहे. स्वतःचा अत्युच्च व अति पवित्र मनोरथ सिद्धीस नेण्यास, मुसलमानी अमदानींतील मराठे सरदार अनुकूल करून घेणें शिवाजी महाराजांस अत्यावश्यक होतें. तेव्हां, त्यांच्या मनावर आपल्या सद्धेतूचें प्रतिबिंब पाडण्यास, त्यांचा संपर्क ज्र्णेंकरून घडेल ती गोष्ट करणें त्यांस जरूर पडलें. अशी गोष्ट

ह्मणजे शरीरसंबंध हीच होय. शरीरसंबंधानें सन्निकटभाव व प्रेमबुद्धि ह्या दोन गुणांचा हृदयांत अभिनिवेश होऊन, अल्पसें तरी चित्ताकर्षण झाल्यावांचून रहात नाहीं. ह्मणून, नुसत्या मोहक वाणीच्या वक्तृत्वापेक्षां, प्रत्यक्ष शरीरसंबंधाचा उपाय शिवाजी महाराजांस अधिक फलप्रद वाटला असावा, हें उघड आहे.

ह्या उपायाचें अवलंबन करण्यांत शिवाजी महाराजांचीं महाराष्ट्रधर्माचीं उदात्त व परिपक्व तत्त्वेंही दृष्टोत्पत्तीस आल्यावांचून राहत नाहींत. बजाजी नाईक निंबाळकर ह्या प्रबल मराठे सरदारानें यवनी धर्माची दीक्षा घेतली असतांही त्यास शिवाजी महाराजांनीं शुद्ध करून जातींत घेतलें; आणि

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरे जनाः ।

ह्या भगवदुक्तीचें मर्म लक्षांत ठेवून, त्याच्या मुलास आपली मुलगी देऊन त्याच्याशीं शरीरसंबंध केला. ही कांहीं सामान्य गोष्ट नव्हे. ह्यावरून शिवाजी महाराजांचें प्रशंसनीय नीतिधैर्य आणि मानसिक औदार्य व्यक्त झाल्यावांचून राहत नाहीं. अशा नरश्रेष्ठाविषयीं सर्व लोकांस पूज्यबुद्धि वाटून, "बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाउलें" ह्या समर्थवचनाप्रमाणें त्याच्या चरणीं त्यांची भक्ति जडावी, ह्यांत आश्चर्य तें काय? शिवाजीच्या महाराष्ट्रधर्माची खरी व्याख्या करण्यास ह्या गोष्टीचें पुष्कळ साहाय्य होईल. सर्वांचें एकीकरण, सर्वांची समुन्नति, सर्वांचा अभ्युदय व सर्वांचा उद्धार जेणेंकरून साधेल, तोच शिवाजीचा खरा महाराष्ट्रधर्म असला पाहिजे. ह्याच धर्माची गुरुकिल्ली रामदास स्वामींनीं शिवाजीस सांगितली. ह्याच धर्माचा अभिमान बाळगणारा तोच खरा मराठा होय. अर्थात् ह्या धर्माचीं तत्त्वें अति उदार व उदात्त असल्यामुळें, सर्व महाराष्ट्रांत संघशक्ति व प्रेमभाव उत्पन्न होऊन, त्याचा अलौकिक प्रभाव घडून आला. ह्या धर्मांत अकारण

जातिमत्सर, परधर्मद्वेष, किंवा आपपरभाव ह्या क्षुद्र मनोवि-
कारांचा गंधही नसला पाहिजे, हें उघड आहे. ह्मणूनच हा धर्म
सर्व महाराष्ट्रीयांस प्रिय होऊन, सर्वांची त्यावर पराकाष्ठेची निष्ठा
बसली, व त्यांच्या हातून स्वराष्ट्रोन्नतीचें प्रशंसनीय कार्य घडून
आलें.

महाराष्ट्रधर्माच्या अंगीं—किंबहुना हिंदुधर्माच्या अंगीं—असा
कांहीं विलक्षण गुण आहे कीं, तो कोणत्याही परधर्माच्या आघा-
तानें केव्हांही नष्टप्राय होऊं शकत नाहीं. त्यामुळें हिंदुराष्ट्रास
कितीही अवनत स्थिति प्राप्त झाली, तरी ती केवळ ह्या विशिष्ट
धर्माच्या अद्भुत सामर्थ्यानें नाहींशी होऊन, हें राष्ट्र पुनः उदय
पावल्यावांचून राहत नाहीं. ह्याच धर्माच्या अंगीं असा कांहीं
दमदार चिवटपणा आहे कीं, त्याच्यावर कितीही आघात
झाले तरी, पुनः त्यांतून, "कीं तोडिला तरु फुटे अणखी भरानें"
ह्या कव्युक्तीप्रमाणें, पुनः जोमदार अंकुर उत्पन्न झाल्यावांचून
राहत नाहींत. हिंदुस्थानांत व दक्षिणेंत मुसलमानांची राज्यसत्ता
स्थापित झाली, व त्यांचा स्वधर्मवृद्धीचा तडाखा एकसारखा
चालू झाला; परंतु त्याच्या योगानें हिंदुधर्मांतील चिवटपणा किंवा
राम नाहींसा झाला नाहीं. मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन ह्यांनीं मुस-
लमानांसंबंधानें लिहितांना एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं,
"इजिप्त, सैरिया, एशिया मायनर, पर्शिया, तार्तरी, इत्यादि
देशांमध्यें मुसलमानांनीं आपल्या सर्व प्रजेस धर्मभ्रष्ट करून टाकिलें
आणि त्यांच्याशीं कोणत्याही रीतीनें सामोपचाराचें वर्तन केलें
नाहीं. परंतु हिंदुस्थानामध्यें त्यांनीं अवघ्या १/१० प्रजेस मुसलमान
करून ९/१० प्रजा हिंदु ठेविली; सर्वांशीं धर्मसंबंधानें सहिष्णुत्वभाव
दाखविला; आणि एके वेळीं ते स्वतःच मुसलमानी धर्म सोडून
हिंदु होण्याच्या बेतांत आले. ह्यावरून त्यांचा अंमल इतर राष्ट्राच्या

मानानें हिंदुस्थानांत फार सौम्य होता, असें दिसून येतें. त्यांनीं हिंदूंच्या चालीरीति कायम ठेवून, त्यांच्या पूर्वींच्या राज्यव्यवस्थेचें स्वरूप बदललें नाहीं; आणि ते जिंकले गेले होते ह्मणून त्यांच्यावर इतर राष्ट्रांप्रमाणें विशेष जुलूम व बलात्कार केलेला दिसत नाहीं."* ह्यावरून इतकेंच सिद्ध होतें कीं, हिंदुराष्ट्राच्या अंगीं जो चिवटपणा आहे, तो केवळ मुसलमानांच्या अमलांतही कायम राहून, त्यांच्या धर्मवेडासही पुरून उरला. अर्थात् असा दमदार चिवटपणा, अशी जगत्कालप्रलयावधि जीवंत राहणारी शक्ति, असें अलौकिक तेज आणि असा अपूर्व प्रभाव ज्या धर्मांत आहे, तो कोणत्याही विधर्मी राष्ट्राच्या संसर्गानें विनाश पावेल हें कधींही संभवनीय नाहीं. उलट, त्यांतील सत्वगुणानें कोणतेंही विधर्मी राष्ट्रच तद्रूप होईल. हिंदुधर्मांतील सौम्यता, त्यांतील सात्विकपणा, त्यांतील सोज्वलता आणि त्यांतील सहिष्णुता ह्यांचाच परिणाम मुसलमानी धर्मावर होऊन, मुसलमान लोकच सौम्य बनले, असें ह्मटलें तरी चालेल. ह्याच कारणामुळें इतर राष्ट्रांप्रमाणें यवनी धर्माचा प्रभाव हिंदुस्थानांत घडून आला नाहीं, ह्यांत आश्चर्य तें काय? दक्षिणेंतील मुसलमान बादशाहांवर हिंदुधर्माची किती अलौकिक छाप पडली होती, हें त्यांच्या अमलांतील मराठ्यांच्या इतिहासावरून व्यक्त होण्यासारखें आहे. इब्राहिम आदिलशाहानें आपणास

---

* "In Egypt, Syria, Asia Minor, Persia, Tartary... the Mussalmans seem to have converted all their subjects, and to have made no compromise with infidel communities. In India they left nine-tenths of the nation unconverted, were tolerant to all, and at one time were nearly turning infidels themselves. Their rule seems also to have been more mild than elsewhere. Old customs and forms of Government were kept up, and less rapacity and violence shown towards the conquered."— Page 348.

'इब्राहिम जगद्गुरु' ह्मणवावें आणि दत्तात्रयाची भक्ति करावी; किंवा निजामशाहानें अथवा मलिकंबरानें चिंचवडाच्या देवस्थानास वर्षासनें व इनामें द्यावींत; इत्यादि गोष्टी हिंदुधर्माच्या सात्विक स्वरूपाच्या दर्शक होत, असें कोण ह्मणणार नाहीं? अर्थात् अश उदात्त व स्थितिस्थापक हिंदुधर्माचा, हिंदुस्थानांतील मुसलमानांवर अनुकूळ परिणाम घडावा, व दक्षिणेंत तर त्याचें विशेष फळ दृष्टीस पडावें, हें अगदीं साहाजिक आहे.*

मुसलमानी अमदानींतील महाराष्ट्रीयांस स्वतःची उन्नति करून घेण्यास धर्माचें उदार तत्त्व कारण झालें. हिंदु लोकांविषयीं

---

* हिंदुधर्माच्या सात्विकपणाचा प्रभाव हिंदुस्थानांतील मुसलमानांवर घडून आल्यामुळें ते अधिक सौम्य झाले, व हिंदु लोकांचें विशेष दळण-वळण सुरू होऊन त्यांच्यामध्यें अधिक प्रेमभाव उत्पन्न झाला, ही गोष्ट पुष्कळ पाश्चात्य ग्रंथकारांनींही मान्य केलेली आहे. ह्या संबंधानें विस्तारेंकरून विवरण करण्याचें हें स्थल नाहीं; तथापि महादजी शिंद्यांच्या कारकीर्दींत हिंदुस्थानांत आलेल्या उइल्यम हंटर नामक एका आंग्ल गृहस्थानें हिंदु व मुसलमान ह्या दोन्ही धर्मासंबंधानें केलेलें निरीक्षण येथें दिल्यावांचून राहवत नाहीं. तो लिहितोः—

"And here, we may observe, that these two religions having existed together in Hindustan, for so long a time, the professors of both have acquired a habit of looking on each other with an eye of indulgence, unusual in other countries, between those who maintain such opposite tenets. Thus the Hindu is often seen to vie with the disciple of Ali, in his demonstrations of grief for the fate of the two martyred sons of that apostle; and in the splendour of the pageant annually exhibited in their commemoration....This degree of complaisance is perhaps not surprising in the disciple of Brahma, whose maxim is, that the various modes of worship, practised by the different nations of the earth, spring alike from the deity, and are equally acceptable to him. But, even

मुसलमानांच्या मनांत स्नेहभाव व सहानुभूति उत्पन्न होण्यास त्यांचा निरुपद्रवी, शांत व सात्विक धर्मच कारण झाला. त्यामुळें त्यांच्या ठिकाणीं मुसलमान बादशाहांचें प्रेम जडून त्यांनीं त्यांस उत्तेजन दिलें; व त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांना मोठमोठे अधिकार देऊन, त्यांच्या अंगीं राष्ट्रोद्धाराचें महत्कार्य करण्यास पात्रता व सामर्थ्य आणून दिलें. ग्रिबल नामक दक्षिणच्या इतिहासकारानें एके ठिकाणीं ह्मटलें आहेः—"विजापूर व अहमदनगर येथील मुसलमान बादशाहांनीं बर्गे लोकांचें सैन्य ठेऊन व त्यांना आपल्या दरबारांतील मोठेमोठे राजकीय व लष्करी अधिकार देऊन राष्ट्रोन्नतीचें खरें शिक्षण दिलें; आणि त्यांचें, आपल्या स्वतःच्या बादशाहीचेंच नव्हे, परंतु पुढें सर्व हिंदुस्थानचें सार्वभौमत्व मिळविणारें, एक प्रतापी व तेजस्वी राष्ट्र निर्माण केलें." हे उद्गार पुष्कळ अंशीं खरे आहेत, ह्यांत शंका नाहीं.

मुसलमानी अमलानें मराठ्यांचें किंवा हिंदुस्थानचें विशेष नुकसान झालें, असें कधींही मानितां यावयाचें नाहीं. त्यांच्या राज्यपद्धतींत पुष्कळ दोष असतील, परंतु सामान्यतः तिनें हिंदुलोकांचें सत्व ( Spirit ) कायम ठेविलें होतें, असें मि० एल्फि-

---

they, who follow the intolerant doctrines of the Koran, are no longer those furious and sanguinary zealots, who, in the name of God and his prophet, marked their course with desolation and slaughter, demolishing the Hindu temples, and erecting mosques on their ruins. They found *the patient constancy* of the Hindu *superior* to their violence; that the fear of torments and of death was unable to make him desert the tenets which his ancestors had handed down to him, from an unfathomable antiquity; but, that if left in the quiet possession of these, he was a peaceable, industrious and valuable subject. Accordingly, we observe among the Mussalmans of Hindustan, a great deference for the prejudices of their neighbours or dependants, of the Hindu persuasion &c."

न्स्टन ह्यांचेंही मत आहे. एका निःपक्षपाती इंग्रज ग्रंथकारानें मुसलमानी अमलासंबंधानें असें ह्मटलें आहे.—

"मुसलमान राज्यकर्त्ते हे हिंदुस्थानचे गृहिवासी होऊन त्यांनीं तेथील प्रजेप्रमाणें आपलें सुखदुःख व हितानहित एकरूप केलें होतें. त्यांनीं एकंदर मानानें तेथील लोकांच्या चालीरीति व धर्म, आणि लोकांचीं वतनें ह्यांचें संरक्षण केलें होतें. त्यांनीं पूर्वीची ग्रामसंस्था, व पंचायतीची न्यायपद्धति व उत्तम पोलीस कायम ठेविलें होतें. त्याच्या योगानें, अगदीं थोड्या खर्चात, लोकांच्या जीविताचें व वित्ताचें चांगलें रक्षण होत असे. त्यांनीं हिंदुस्थानावर एखाद्या राष्ट्रीय कर्जाचें ओझें लादलें नव्हतें. ते प्रजेकडून प्राप्त होणाऱ्या करभाराच्या उत्पन्नांतून मोठमोठ्या रकमा, सार्वजनिक उपयोगाच्या कामांप्रीत्यर्थ आणि विद्यादानाप्रीत्यर्थ, खर्च करीत असत. त्यांनीं हिंदुस्थानचे व्यापारी, कारागीर व मजूर लोक ह्यांचे आश्रयदाते जे उच्च प्रतीचे जहागिरदार लोक, त्यांचा नाश करण्याचा कधींही प्रयत्न केला नाहीं. त्यांनीं हिंदुस्थानच्या लोकांस कमी दर्जाचे लोक अशा बुद्धीनें वागविलें नाहीं. त्यांनीं त्यांच्याशीं सामाजिक गोष्टींत मोकळेपणानें दळणवळण ठेविलें होतें. त्यांनीं स्वतःस ज्या कमी दर्जाच्या व कमी पगाराच्या जागा भरतां येत नव्हत्या, त्याच एतद्देशीयांकरितां राखून ठेविल्या नव्हत्या. त्यांनीं मुलकी खात्यांत मोठमोठे अधिकार त्यांच्या हातीं दिले होते. तात्पर्य, कनिष्ठ प्रतीच्या लोकांस मोठमोठ्या हुद्यांवर व लष्करी अधिकारावर नेमून, नित्यशः त्यांना स्वतःचा अभ्युदय करून घेण्याची संधि त्यांनीं दिली होती. ह्या योगानें त्यांचें सत्व किंवा त्यांचा उत्साह कायम राहिला, असें मि० एल्फिन्स्टन ह्यांनीं ह्मटलें आहे."

ह्यावरून इतकेंच सार निघतें कीं, मुसलमानांनीं आपल्या अमलामध्यें, हक्कदार राज्यकर्त्यांच्या जातीचा एक वर्ग व एतद्देशीय लोकांचा एक वर्ग, असे प्रजेचे दोन निरनिराळे वर्ग करून सर्व राष्ट्राची क्रमशः अवनति केली नाहीं. त्यांच्या पुष्कळ वर्षांच्या कारकीर्दींत हिंदुस्थानांतील लक्षावधि प्रजेमध्यें पुष्कळांवर जुलूम झाले होते. परंतु त्यांनीं सर्वांची उन्नतीची आशा कायम ठेविली होती. त्यांनीं आपल्या सर्व हिंदु प्रजेस योग्य महत्त्वाकांक्षेचीं फळें उपभोगण्याचा मार्ग खुला ठेविला होता; आणि अधिक बुद्धिमान्, कर्तृत्ववान् व साहसी लोकांस, मानमरातब, राजकीय सत्ता, मोठमोठे लष्करी अधिकार, आणि त्याबरोबर जहागिरी व इनामें हीं मिळविण्याची लालसा बाळगण्यास प्रोत्साहन दिलें होतें."

हें मुसलमानी अमलाचें निरीक्षण किती यथार्थ आहे, हें पाहण्यास मुसलमानी अमलांतील मराठ्यांच्या इतिहासाचाच फार उपयोग होईल. व त्यावरून, जे मुसलमान राज्यकर्ते आपल्या प्रजेस प्रेमभावानें वागवीत होते, त्यांच्याशीं महाराष्ट्रीय प्रजाजनही अत्यंत राजनिष्ठेनं वागत होते, असें दिसून येईल. प्रकृत निबंधांत जी माहिती सादर केली आहे, ती केवळ इतिहासदृष्टीची असून, तिचा उद्देश मुसलमानी अमदानींतील मराठ्यांच्या इतिहासाचें खरें स्वरूप व्यक्त व्हावें, व त्याचें संशोधन करण्याकडे एतद्देशीय विद्वानांचें लक्ष लागावें, हाच आहे. हा उद्देश सिद्धीस गेला तर मुसलमानी अमदानीविषयीं आपणांस आदरबुद्धि वाटून, मुसलमानबंधूंविषयीं अधिक प्रेमभाव उत्पन्न होईल, ह्यांत शंका नाहीं. तात्पर्य, इतिहास हा आमचा गुरु आहे. त्याची सत्य, सरळ व शुद्ध अंतःकरणानें भक्ति केली, तर आपलें कल्याण झाल्यावांचून राहणार नाहीं.